


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







ऑगस्ट
संस्मरण
विशेषांक




साहित्य • कला • संगम

वर्ष १८ वें



टेलिफोन
७७७६५

## श्रेयनामावलि—

• **विविधरंगी चित्रभेट** – कविता कामिनीचें राजकाज– **विशाखदत्त**
• **पु. भा. भावे** – मनोरे • **जयवंत दळवी** – जत्रेंतील पात्रें – आमचें त्यावेळचं 'मॉटेसरी' आणि पुढे • **सेतुमाधव पगडी**–उर्दू कवींचें महाराष्ट्र प्रेम • **पकू** – शब्द कोडगे • **पद्माकर गोवईकर** – सहदेवा थोडा आग्नि आण • **त्रि. अ. तेंब्रे**– दान • **श्री. ज. जोशी**– प्रश्न • **बाळ जेरे** – भारताची पहिली क्रांतिकारक महिला • **मधु कुलकर्णी**– शिष्ठ • **सुधीर सौर**– साक्ष • **आतमाराम निळकण्ठ**– हा जय नांवाचा इतिहास आहे.– असशील तशी सभेमध्यें ये • **आनंद साधले** – कविता कामिनीचें राजकाज – विशाखदत्त • **गोपालकृष्ण भोबे** – आहत नाद अपरंपार.

### सदरें:—

• एकपानी कथा – **के. ना. बर्वे** – लावण्य • प्रश्न पंचायत • दीपमाला–**सारस्वत, गोपालन**
• **युद्धस्य कथा** – बहादूर ब्रिगेडियर

दलाल आर्ट स्टुडिओ · ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

* संपादक-मुद्रक-प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ * या प्रतीस किंमत रु. १। अधिक रजिस्टर पोष्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. * या अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं.



विशाखदत्तः— एका केवल सर्वसाधनविधौ बुद्धिस्तु मा गान्मम ॥

## कविता कामिनीचें राजकाज

ज्यांत शृंगाररस नाहीं असें उत्कृष्ट ललित साहित्य असूं शकेल असें ज्यांस वाटत नाहीं त्यांनीं विशाखदत्त कवीचें मुद्राराक्षस नाटक पहावें. हें नाटक संस्कृत असलें तरी यांत नायिका नाहीं आणि स्तन व जघन शब्दांचा उल्लेख नाहीं हें कोणास सांगूनही पटणार नाहीं. पण ही वस्तुस्थिती आहे.

इतिहास कालांत भरतभूच्या भाग्यवान सुवर्णयुगाची प्रभात ज्यानें आणिली त्या सम्राट चंद्रगुप्ताच्या राज्यप्राप्तीवर हें नाटक आधारलेलें आहे. या नाटकाचा नायक आहे चाणाक्य. कौटिल्य या नांवाने ज्यानें अर्थशास्त्र लिहिलें, वात्स्यायन या नांवाने ज्यानें कामशास्त्र लिहिलें, तो बुद्धीचें मूर्त निधान असा विष्णुगुप्त या नाटकांत चाणाक्य या नांवानें वावरतांना दिसतो. या चाणाक्याची स्वभावरेषा संस्कृत साहित्यांत अनन्यसाधारण आहे.

आपल्या वैयक्तिक अपमानाचा सूड म्हणून चाणाक्य हा नंद सम्राटांचा विध्वंस करून चंद्रगुप्तास सम्राट बनवितो. नंदाचा राजनिष्ठ अमात्य राक्षस केवळ राजनिष्ठेमुळेंच चंद्रगुप्ताचा निःपात करावयास झटत असतो. हिमालयासारख्या उत्तुंग चारित्र्याच्या या दोन व्यक्तींच्या बुद्धिसामर्थ्याची निःस्वार्थ लढत हा या नाटकाचा विषय आहे. त्यांत राजनिष्ठ, पण कुटिलतेंत उणा असलेला राक्षस, मूर्तिमंत कौटिल्य अशा चाणाक्यापुढे शेवटीं हार खाऊन चंद्रगुप्तास वश होतो. चाणाक्याच्या राजकारणी बुद्धीची कक्षा या नाटकांत इतकी विस्तृत झाली आहे आणि झेंप इतकी उंच गेली आहे कीं तिच्या दर्शनानें मनुष्य स्तिमित होऊन जातो, सारें भान विसरून जातो.





अनुक्रमणिका

*मला फार तीव्रपणें वाटत आहे कीं त्या माणसाच्या एकंदरींत आयुष्याचा इतिहास शोधून काढावा. त्याचीं कांहीं ओळख पटवून द्यावी, निदान शब्दांत त्याचीं कांहीं खूण ठेवावी. पण तें कांहींच आतां शक्य नाहीं माझा आणि त्याचा परिचय झाला तो त्याची शुद्ध-बुद्ध गेल्यावर.*

## — पु. भा. भावे



> अगदीं किरकोळ गोष्टींत देखील केव्हां केव्हां फार मोठा आशय आढळतो. अनुभवानें तसा अगदीं साधा परंतु तो मनावर फार मोठा परिणाम करतो. प्रतिभावंतांना त्या क्षुल्लक घटनेंत देखील सुंदर कथेचीं बीजें आढळतात. अशा **कथा बीजांची** एक लेखमाला ' मनोरे ' दीपावलींतून चालू आहे. लेखकांनीं याप्रमाणें आपले कांहीं लेख दीपावलीकडे अवश्य पाठवावेत. योग्य निर्णयानंतर स्थान देण्यांत येईल.
>
> —सं.

रुळवाटेचें स्थानक (रेल्वे स्टेशन) ही जागा मला नेहमींच आवडते. तासन् तास मोठ्या मजेनें मी प्रतिक्षागृहांत किंवा धक्कयावर (प्लॅट फॉर्म) भटकून काढूं शकतो. स्थानकावर अनेक माणसे येतात आणि जातात. अनेक गाड्या येतात आणि जातात. तेथें सारखी हालचाल चालू असते. सारखें कांहीतरी घडत असतें. स्मशानांत जशी सर्व प्रकारची माणसें येतात. तशीच स्थानकावरहि सर्व प्रकारची माणसें येतात, ट्रंकेंत प्रेत लपविणारा हत्यारी, मुलाला निरोप द्यायला आलेले आई-बाप, पहिल्या प्रवासाला निघालेलें जोडपें, प्रतिदिवसांच्या प्रवासाला कंटाळलेले कर्मचारी; खोमचेवाले, चोर, हमाल, भाविक, कितीक माणसांची स्थानकावर सतत वर्दळ असते. किती प्रकारची त्यांचीं सुखदुःखें असतात, किती प्रकारचे त्यांचे चेहेरे असतात. हे चेहेरे पहाण्यांत आणि त्या चेहऱ्यांच्या धन्याविषयीं कल्पनाचित्रें रंगविण्यांत माझा वेळ पाहतां पाहतां निघून जातो. स्थानकावर कांहींना कांहीं वेगळें मला पहावयास मिळेल, ह्या अपेक्षेनेंच स्थानिक गाडींतून मी बोरीबंदरच्या धक्कयावर पाय ठेवतो. कधीं मला खरोखरच कांहीं वेगळें पहावयास मिळतें, आणि जेव्हां मला विशेष वेगळें कांहीं दिसत नाहीं, तेव्हांहि मी जें पाहतो तें मला वेगळेंच वाटतें. नदीच्या प्रवाहाप्रमाणें स्थानकावरचें जीवन नेहमीं वाहतें असतें, जिवंत असते, ही गोष्टच मला पुरेशी वाटते. ही जागाच मुळीं गतीची, प्रवाहाची व प्रस्थानाची आहे. ह्या प्रस्थान बिंदूपासून माणसें कुठलीतरी वेगळी दिशा घेतात, नेहेमीची वाट व नेहमीचें जग सोडून अन्य कुठेंतरी जातात, हीच गोष्ट मुळीं मला फार आकर्षक वाटतें. आणि म्हणून मनाला किंवा शरीराला जाड्य आलें म्हणजे मी बोरीबंदरकडे धाव घेतो.

त्या दिवशीहि मी असाच एका स्थानिक गाडींत चढलो. माझ्या मनावर भोजनोत्तर स्वास्थ्याचें साम्राज्य पसरलें होतें. गाडीच्या गतीबरोबर बसल्या जागीं झुलणें मला मोठें सुखकारक वाटत होतें. माझें शरीर न शिणवितां तो धावता रथ माझ्या डोळयासमोरून डोंगर-खाड्यांचे व बहुढंगी आकाशाचे पट उलगडत होता. मोठ्या सुखासमाधानाने मी माझा प्रवास





अनुक्रमणिका

पूर्ण केला व बोरीबंदर स्थानकावर पाऊल ठेवलें. तेथें मला नेहमीचेच ते परिचित पण तरीहि नेहमी नवे वाटणारे दृश्य दिसत होतें. तेथील प्रवाशांचे घोळके माझ्या परिचयाचे होते. तरीहि ते तेच प्रवासी नव्हते. गाड्याहि त्याच होत्या आणि तरीहि प्रवासाच्या प्रत्येक फेरीबरोबर त्या मला नव्याच वाटत होत्या. केळी, चिकू, अननस ह्या ओळखीच्या फळांची विकाने भरलेली होती, आणि तरीहि ती फळें तीच नव्हती. चहा–फराळाच्या, सिगारटेच्या व आईस्क्रीमच्या विकानासमोर माणसें उभी होती. हीं माणसेंहि वेगळी होती व त्या वस्तूहि वेगळ्या होत्या. काल तेथें जी माणसे मी पाहिली तीही नव्हती व तेथें ज्या वस्तू पाहिल्या त्याहि त्या नव्हत्या. कालचीं फळें कोणती व आजची फळें कोणती, त्यांचा उपभोग घेणारी माणसेहि वेगळी! परंतु तरीहि उपभोग घेण्याचे व जगण्याचे, तेच जुने कार्य ती आज नव्याने करीत होती. जोड्याना तकाकी देणारे चांभार, उतारूंची नेआण करणाऱ्या पिवळ्या पट्ट्यांच्या स्वयंप्रेरिका, स्थानकासमोर अनेक फुटकळ वस्तूंचा व्यापार करीत बसलेले सिंधी फेरीवाले, खिडकीसमोर प्रवास पत्रिकेसाठी रांगा धरणारे प्रवासी, वजन काट्यावर स्वतःला तोलणारी हौशी माणसें, ह्या साऱ्यावरून दृष्टी फिरवीत मी इतस्ततः भटकत होतो. भटकतां भटकतां सवयीप्रमाणें मी पुस्तकांच्या ठेल्यासमोर येऊन उभा राहिलो. येथें मला परिचित नियतकालिकांचे अंक दिसत होते. त्याच परिचित लेखकांचीं सर्व पुस्तकें दिसत होतीं, तीं पुस्तकें मी विकत घेतली असती वा नसती, परंतु त्या साऱ्या ग्रंथभांडारावरून दृष्टी फिरविल्याविना मला चैनच पडत नसे. माझ्या आयुष्याच्या आन्हिकाचा तोहि एक अपरिहार्य भाग होता, आणि त्या पुस्तकांकडे पहात असतांच जे मी पहात नव्हतो त्याचीहि मला जाणीव होती. समुद्रांत जाळे फेकणारा कोळी, गल्ल्याशेजारी उभा असणारा वाणी, कार्यालयांत मान मोडून काम करणारा कारकून, पदपथावर हात पसरून बसलेला भिकारी, हातांत हात घालून भटकणारें जोडपें, दूरध्वनी उचलणारा व्यापारी, ह्या विशाल मुंबईनगरींतील कितीतरी न दिसून दिसणारीं माणसें मी त्या क्षणीं पहात होतो. मी पुस्तकें पहात होतो व ह्या एकाच क्षणीं अनेकविध कार्यांत मग्न असणाऱ्या सहस्रो कधीं माणसाच्या अस्तित्वाची जाणीवहि माझ्या मनांतून गेलेली नव्हती, तीं पुस्तकें व ती माणसें ह्यांचा विचार करीत मी गुंगत होतो. तोंच माझ्या कानावर कसला तरी विलक्षण ध्वनी आला. एखादें ओल्या कपड्याचे गाठोटे धपकन् खालीं पडावें तसा तो ध्वनी होता. मी भानावर आलो व मागे वळून पाहिले. मी जें पाहिलें, तें पाहून माझें अंतःकरण चरकलें. डोळे फिरवून माणसाचे एक मुटकुळे भुईवर आदळलें होतें. त्या माणसाची बुबुळे कुठें कपाळांत नाहीशी झाली होती आणि डोळयांचा पांढरा भाग तेवढा दिसत होता. बेशुद्ध होऊन वेडावाकडा तो माणूस खाली पडला होता व त्याच्या नाकाकानांतून भळभळा रक्त वहात होतें. ज्या घोड्यावर बसून तो वीज दुरुस्तीचें काम करीत होता तो घोडा शेजारीच रिकामा उभा होता. वर छपरापाशीं काम करीत असतांच विजेचा धक्का बसून तो खाली आला होता. तिशीपस्तीशींतील जाड्याभरड्या कपड्यांतला अनेक अनामिक श्रमिकांपैकी एक असा तो माणूस होता. आणि आपला दैनंदिन उद्योग करीत असतांच विजेचा झटका बसून तो खाली कोसळला होता. त्याच्या नाकाकानांतून रक्त वहात होते व जें कांहीं काम तो करीत होता तें तेथेंच थांबलें होतें. कदाचित् ही त्याच्या जीवनाचीच इतिश्री असण्याचा संभव होता.

धक्का लागल्याविना सहसा कानांतून रक्त येत नाहीं, असें मी ऐकलें होतें. कानांतून वहाणारें त्याचें तें रक्त फार भीतिप्रद दिसत होतें. पण त्या रक्तस्रावाची त्याला जाणीवच नव्हती. जगाचीहि त्याला जाणीव नव्हती. जगाशीं त्याचा संबंधहि कदाचित् आतां संपत आला असेल. भुईवर पडलेलें आपलें शरीर चालत्याबोलत्या जगाला कसें दिसतें, हा विचारहि त्याला शिवत नसेल. जगाच्या नियमांनी ह्यापुढें मुळी तो बांधलेलाच नव्हता. कारण त्याचीं पावलें संभवतः अगदीं ह्या क्षणीं ह्या जगाबाहेर पडत होतीं. आजचा दिवस हा ह्या जगांतील आपला शेवटचा दिवस आहे असें त्याच्या स्वप्नांतहि नसेल. आजच्या दिवसाविषयीं व आयुष्याविषयीं त्याच्या अनेक अपेक्षा असतील, अनेक योजना असतील, पण त्या साऱ्या योजना व अपेक्षा आतां अपुऱ्याच रहाणार होत्या. त्याच्या कानावर विझवून ठेवलेलें विडीचें थोटूक जसेंच्या तसें होतें. हातांतलें काम पूर्ण होतांच तें ओढण्याचा विचार त्यानें करून ठेवला असेल. परंतु तें थोटूक त्याच्या वाटयाचें नव्हतेंच. तें तो कधींही ओढणार नव्हता. उलट त्याच्याच रक्तानें तें थोटूक रंगून निघणार होतें. आणि त्याच्या रक्तानें रंगणें हेंच त्या थोटकाचेंहि भयंकर भाग्य होतें. ओठाशीं घातलेलें थोटूक आपलें रक्त पिणार अशी कल्पना त्यालाहि नसेल. आज ज्या ह्या जीवघेण्या अपघाताची त्याला कल्पनाच असणें शक्य नव्हतें, आणि ती त्याच्या बायकोपोरांना–आईबापांनाहि नसेल. ती बिचारी अगदीं ह्या क्षणीं निर्धास्तपणें आपलीं नियत कर्तव्यें आटोपीत असतील.–नशी ह्या मुंबईतील लक्षावधि माणसें ह्या क्षणीं आपापलीं कामें करीत होती.

आपला बाप, मुलगा, नवरा, भाऊ ह्या क्षणीं रक्त ओकत धरणीवर कोसळला आहे, अशी शंकाहि त्या हतभागी माणसाच्या नातलगांना नसेल. विजेच्या तारांशी त्याचा प्रसंग अनेकदां पडला असेल. हें त्याच्या उपजीविकेचेंच साधन होतें. पण तेंच त्याच्या मृत्यूचेंहि कारण ठरेल हें कोण जाणत होतें !

सुखाचें आणखी एक साधन म्हणून माणसें वीज वापरूं लागलीं आणि त्यानें मृत्यूचें आणखी एक साधन निर्माण करून ठेवलें. प्रकाश आणि गति देणाऱ्या त्या शक्तीनें मात्र ह्या माणसाचे प्राण घेतले. त्याच्या डोळयांतील प्रकाश मालविला. त्याचे चलनवलन हिरावून घेतलें. अगदीं पांचच मिनिटांपूर्वी तो जिवंत होता. अन्य माणसांसमवेतच तोहि जगत होता. पण पांचच मिनिटांत तो गेला. अन्य माणसें अद्यापहि आपापले व्यापार करीत होती. चहाच्या ठेल्यावर चहाचे कप भरले जात होते व रिते केले जात होते. मळके जोडे तकाकी घेऊन पुन्हां नवे दिसत होते. पांच मिनिटांपूर्वी ओरडणारे फेरीवाले अद्यापहि ओरडतच होते. पण ह्याचा स्वर मात्र बंद पडला होता. माणसाच्या ऐन गर्दीतून तो नाहीसा झाला होता. त्याचें चैतन्य हरपलें होतें. केवळ पांचच मिनिटांत मृत्युसारखी भयप्रद व गंभीर घटना घडून गेली होती. माणसाच्या थव्यांतून मृत्यूनें सत्यवानाप्रमाणें त्यांच्यापासून अकस्मात एकाला उचललें होतें. लक्षावधि माणसांनी गजबजलेल्या ह्या नगरांतून एक जीव उणा झाला होता. पण त्याची उणीव कुणालाच भासणार नव्हती.









अनुक्रमणिका

जगाचें रहाटगाडगें तसेंच चालूं रहाणार होतें. मरणाच्या जाळ्यांत एक मासळी गवसली–

पण असंख्य मासळ्या अद्याप तेथें वळवळतच होत्या व अगणित जन्माला येत होत्या. तेथें ह्या काळसर, किरकोळ, सामान्य माणसाचा हिशेबच नव्हता. तरीहि हें खरेंच कीं, विजेचा विश्वासघातकी धक्का खाऊन मरणोन्मुख झालेल्या त्या माणसाचें जीवन त्याच्या दृष्टीनें महत्त्वाचेंच होतें. दुसऱ्या कशाचेंहि इतकें महत्त्व त्याला वा त्याच्या माणसांना वाटणें शक्य नव्हतें. त्याच्या मृत्यूनें त्याचे आईबाप वेडेपिसे झाले असते, बायकोपोरें धाय मोकलून रडली असती. त्या अनामिक माणसाला तेथें तसा रक्त ओकत पडलेला पाहून त्याच्या माणसांचें काळीज फाटून गेलें असतें. आजचा दिवस हा त्या साऱ्यांच्या आयुष्यांतील अतिशय अभागी दिवस होता व इतक्या अकल्पितपणें तो शेवटचा दिवस आज उजाडला होता.

त्यानें उद्यांसाठीं कोणते बेत रचले होते, आयुष्यांत काय काय करावयाचें व मिळवावयाचें त्यानें ठरविलें होतें ? त्याच्या कुठल्यां इच्छा अपूर्ण राहिल्या होत्या ! विजेचा तो भयंकर धक्का बसण्यापूर्वींच्याच क्षणीं त्याच्या मनांत कुठला विचार तरंगत होता ? त्याची आशा कुठें घोटाळत होती ! त्याचें मन कुठें गुंतलें होतें ! त्या काळसर, किरकोळ माणसाचें नांव काय होतें ! तो कुठला होता ? कोठें रहात होता व कोणाचा कोण होता ! त्याच्या मरणाच्या पद्धतीची व त्याच्या मृत्युदिनाची कल्पना त्याची त्यालाच नव्हती. ती आतां माझ्यासारख्याला मात्र आली होती. परंतु मला स्वतःला मात्र माझें मरणस्थान ठाऊक नव्हतें, मरणप्रकार ठाऊक नव्हता. कोण जाणें कदाचित् पुढच्या दहा मिनिटांत माझाहि शेवट होणार असेल ! त्यांत अवघड अथवा अशक्य असें काय होतें !

ह्या कल्पनेसरशी मी भानावर आलो. अज्ञात नांवागांवाच्या त्या हाडामांसाच्या गाठोड्याभोंवती आतां माणसांची गर्दी जमत होती. अद्यापहि त्याच्या नाका–कानांतून उसळून रक्त येतच होतें. तें रक्त मला पाहवेना, तें दृश्य मला पाहवेना. जन्ममृत्यूच्या अकल्पिततेचें गूढ मला सुन्न करीत होतें. सारें जग पुसट व धिटकें झाल्यासारखें मला वाटत होतें. तरीहि त्या पुसट जगाच्या पडद्यावर त्या अनामिक माणसाचा चेहरा मला स्पष्टपणें रंगविलेला दिसत होता. अनेक माणसें मी पाहिली व त्यांना विसरून गेलो. पण ज्याला मी केवळ कांहीं मिनिटेंच पाहिलें त्या अपरिचित माणसाचा चेहरा मला अगदीं स्पष्टपणें आठवतो. त्याच्या नाका–कानांतून बुडबुडणारे काळे काळे रक्त अगदीं ह्या क्षणीं माझ्या डोळ्यांना दिसत आहे व मला फार तीव्रपणें वाटत आहे कीं त्या माणसाच्या एकंदरीत आयुष्याचा इतिहास शोधून काढावा. त्याची कांहीं ओळख पटवून घ्यावी, निदान शब्दांत त्याची कांहीं खूण ठेवावी. पण तें कांहींच आतां शक्य नाहीं. माझा आणि त्याचा परिचय झाला तो त्याची शुद्ध–बुद्ध गेल्यावर. मी केवळ त्याच्या मरणवेदनांचा साक्षीदार होतो. जसे कांहीं साक्षीदार केवळ जीवनाचेच असतात तसे कांहीं साक्षीदार केवळ मरणाचेच असतात. एखाद्या अगदीं अनोळखी माणसास केवळ पोहोंचविण्याचेंच काम करतात. तो माझ्या दृष्टिसमोरून केव्हांच नाहींसा झाला पण माझ्या मनांतून मात्र तो कांहीं केल्या नाहींसा होत नाहीं. जणूं मरणाचें अभंग शिक्कामोर्तब घेऊनच त्याचे माझे कांहीं संबंध जोडले गेले. म्हणून मला त्याला विसरता येत नाहीं. बोरीबंदरवरील पुस्तकांच्या ठेल्यासमोर जेव्हां मी उभा रहातो तेव्हां त्याचा तो दुमडलेला देह मला मूर्तिमंत दिसतो. वृत्तपत्रांचे व नियतकालिकांचे जुने अंक रद्दीत समाविष्ट झाले तेथें त्याच नियतकलिकांचे नवे अंक आले. पण त्या माणसाचें विस्मरण मला झालेलें नाहीं. मला त्याच्या विषयीं व जन्ममृत्यूच्या आनर्यंत अपघाताविषयी सीमेचे कुतुहल वाटते. तो माणूस मेला पण अद्यापहि तो माझ्या कल्पनेंत जिवंत आहे व त्याला शब्दांत सजीव करण्याची इच्छाहि तितकीच जिवंत आहे. जन्ममरणाच्या रहस्याचा भेद घेण्यासाठीं धडपडण्याची ही इच्छा आहे. त्या इच्छेचा पसारा एखाद्या कादंबरीलाहि पुरेल किंवा अनेक कथा–कादंबऱ्यांनाहि हें रहस्य पुरून उरेल.

अशीच कांहीं हुरहुर वाटणारी जाणीव मला तो फरशीचा तुकडा पाहून होते. त्याला मी फरशीचा तुकडा म्हणतो पण तो खरोखर एकत्र सांधलेल्या अनेक रंगीबेरंगी चिनी मातीच्या तुकड्यांचा ढलपा आहे. त्या ढलप्यांत निळ्या गुलाबी फुलांचे एक अर्धवर्तुळ दिसतें. छोटेंसें पांखरूं दिसते. एका गोड मुलीचा चेहरा दिसतो. कुठल्या तरी जुन्या घराच्या भुईचा तो तुकडा आहे. या तऱ्हेच्या चिनी तुकड्यांचे नक्षीदार भुईकाम (Mosiac flooring) मुंबईंतील अनेक जुन्या घरांतून अद्याप आपणास आढळतें. समुद्रकांठीं एकेकाळीं तें घर असेंच उभें असलें पाहिजे. तें एकदाचें केव्हांतरीं पडलें व त्याचे ढीगच्या-ढीग समुद्राच्या कांठानें पेरून देण्यात आले. विटा, दगड, लांकूड, चौकटी, काळ्या–पांढऱ्या फरशा. चिनीचे एकमेकांना अद्याप चिकटून राहिलेले तुकडे. ते सारे अद्याप तुम्हाला तेथें दिसतील. तिथेंच समुद्रकांठीं हा चिनीचा नक्षीदार तुकडाहि ऊन पाऊस खात पडला आहे. अनेकदां मी तेथें जातो व तो तुकडा अद्याप तेथें पडून आहे किंवा नाहीं हें पाहून घेतो.

गिरगांवांतून मी निघतो. ह्यूजेस रोड, गिब्ज रोड, नेपिअन रोड, नेपिअन सी रोड, नारायण दाभोळकर रोड असा प्रवास पायीं पायीं मी करतो. सबंध मलबार टेकडी मी रमतगमत चढतो. कांहीं क्षण झुलत्या उद्यानापाशीं थांबतो (Hanging Garden) समुद्राचा व हा एखाद्या चित्रासारखा दिसणारा देखावा, टेकडीच्या माथ्यावरून मी पाहून घेतो. वायुमान पालटते. गजबजलेले गिरगांव मागें पडतें. झुलतें उद्यान सोडून मी ऑल सेन्टस् चर्चपाशीं येतांच सारें आश्चर्यकारक रीतीनें शांत झालेलें मला दिसतें. मग नेपिअन रोडनें मी मलबार टेकडी उतरूं लागतो. येथें मुंबईच्या जुन्या वैभवाचें वेगळेंच दर्शन मला घडतें. ही मुंबई शांत आहे. अद्याप येथें ठेंगणे-ठुसके एखादृदोन मजल्यांचे बंगले उभे आहेत. त्या बंगल्यांभोवताली हिरवळ आहे, उद्यानें आहेत. ठोकळ्यांसारखी उंचच उंच व्यक्तिमत्त्वशून्य पिंजरेवजा घरें आतां येथेंहि डोकावूं लागलीं आहेत. पण शांत, सुंदर, सुबत्तेच्या व शिस्तीच्या जुन्या दिवसांचे स्मरण देणारे बंगले अद्यापहि येथें दिसतात. त्या बंगल्यांच्या दारांवर 'मेहेता', 'चंदावरकर', 'मलबारी', 'वाच्छा' अशा पुसट होत आलेल्या पाट्याहि मी पहातो. माझें मन कित्येक दशकें मागें धावत जातें.

अल्पाकचा काळा कोट व कॉलर घालून एखादा रुबाबदार रावबहादूर आतांच ह्या बंगल्यांतून येईल असें मला वाटतें.

ऐन जवानीतल्या गंधर्वांची गाण्याची तान घुमतांना मी ऐकतो. 'हंटले पामर' बिस्कुटे, हवाना चिरूट, स्कॉच व्हिस्की, मनगटापर्यंत



# स्वातंत्र्य दिन १९६२

आजचा दिवस म्हणजे एका महान यज्ञपूर्तीचें स्मृति-चिन्ह होय. या यज्ञामध्यें गुलामगिरींतून मुक्त होण्यासाठी आपल्या हजारो देशबांधवांनी आपल्या सर्वस्वाचा त्याग केला आहे.

आपण सुद्धां; आपल्या देशाची सेवा करण्यासाठी अशीच त्यागाची आणि आपलें सर्वस्व अर्पण करण्याची वृत्ती अंगी बाणवूंया. आपल्या राष्ट्राच्या योजना सफल करण्या-साठीं आपण एकदिलानें झटून आपल्या मातृभूमीच्या स्वातंत्र्याचा आणि उत्कर्षाचा भक्कम पाया बांधू या.



## आपलें राज्य व राष्ट्र शक्तिशाली करा

प्र सि द्धि सं चा ल क, म हा रा ष्ट्र शा स न, मुं ब ई







पोलका व पुणेरी जोडे घातलेल्या विदुषी, शुभ्र गणवेषांतले परिचारक, 'रेवती'च्या घराकडे निघालेला आश्विन-शेट, घोड्यांच्या-गाड्या, गोऱ्या गव्हर्नरची स्वारी, टिळक, रानडे, गोखले, भांडारकर...

नेपिअन रोडने मी मलबारहिल उतरतो. वाळकेश्वराचें तें प्राचीन मंदिर मी मनोमन पहातो आणि मलबारहिलची पालटत गेलेलीं रूपें, तिथें राहून गेलेली अनेक माणसें, त्यांचे दिवस व त्यांचे जीवनप्रकार......

मध्येंच समुद्र माझ्या डोळ्यांसमोर तळपून जातो. नेपिअन सी रोड सोडून मी वळतो. सर नारायण दाभोळकर रोड व क्रॉस लेन–अनेक मंत्र्यांची निवासस्थानें येथें आसपास आहेत. डॉ. भगवानदास रोडसमोर अथांग समुद्र पसरलेला मी पहातो. समुद्राला टेकूनच घरांच्या रांगाच्या रांगा आहेत. मी खाली खडकावर उतरतो. वेळ भरतीची आहे. खडकांच्या रांगा झांकल्या जात आहेत. येथेंच समुद्राच्या कांठावर त्या पाडलेल्या घरांचे ढीग विखुरले आहेत, त्यांतच तो चिनीचा नक्षीदार तुकडा आहे. मी एका मोठ्याशा दगडावर आसन टेकतो व तो चिनीचा तुकडा हातांत घेतो. सूर्य मावळतीला चालला आहे. ह्या जागीं वर्दळ फारशी नाहीं. कांठावर एक-दोन गाड्या उभ्या आहेत. कांहीं जोडपीं खबदडींत व खडकांवर मुक्त प्रेम करीत बसलीं आहेत. मागें नऊ–दहा मजल्यांची दोन–तीन घरें उभी झालीं आहेत, एक दोन उभी होत आहेत. जुने सुटसुटीत, डौलदार बंगले पाडून त्यांच्या उरावरच हे सरळसोट चौरस चौरस आठ–नऊ डोक्यांचे राक्षस उभे होत आहेत आणि ज्यांच्या जागीं हे उभे होत आहेत त्या घरांची वीटन वीट मोकळी करून ह्या येथें फेंकण्यांत आली आहे.

त्यांतलाच हा एक तुकडा आहे. हा नक्षीदार तुकडा ह्या मागच्याच घरांपैकीं एकाचा असला पाहिजे. मी त्या गुळगुळीत तुकड्यावरील फुलाकडे, पांखराकडे व चेहऱ्याकडे पहात रहातो. आतां तो केवळ एक उकिरड्यावर पडलेला तुकडा आहे. पण एकेकाळीं तो एका नांदत्या घराचा भाग होता. तें घर केव्हां बरें बांधलें गेलें असेल ? ह्या अशा प्रकारची चिनी फरशी भुईत केव्हां बरें घालीत असत ! **'ठगाची जवानी'** व **'तारा'** लिहिणारा पंधरा वर्षांचा **मेडोज टेलर** मुंबई बंदरांत उतरला. त्याला सव्वा शतकावर काळ लोटून गेला. आजच्या आझाद मैदानावर इंग्रजांनी दोनचार बंडवाले तोफेच्या तोंडी दिले त्यालाहि शतक उलटून गेलें. हा तुकडा इतका जुना तर नव्हेच ! **मेजर कँडी** व **जगन्नाथ शंकरशेट** यांचा काळ ह्यानें पाहिला नसावा. परंतु टिळकांच्या कर्तृत्वाशीं आणि हिंदु घरांत येऊन आवडीनें पुरणपोळी (व द्रव्य) खाणाऱ्या क्रॉफर्ड साहेबाशीं ह्याचा परिचय असेल. तें घर तेव्हां उभें झालें असेल, तेव्हांच ह्याला ह्याचा आकार व ह्याचें स्थान मिळालें असेल. हा तुकडा कुठला बरें असेल ? दिवाणखान्यांतील असेल काय ? तर मग कितीतरी गेलेल्या माणसांची पावलें ह्याला स्पर्श करून गेलीं असतील. क्रॉफर्ड ? टिळक ? अच्युत बळवंत ? गणपतराव जोशी ? अवंतिकाबाई गोखले ? कुणास ठाऊक ह्यानें कुणाकुणाला पाहिलें तें ? त्यापैकीं बहुतेकांची नांवेहि आज नाहींशीं झाली आहेत. ह्या तुकड्यानें कर्ण्याचे ग्रामोफोन पाहिले असतील ! व नळ्यांचेहि ! डिटमार–किटसनचे दिवे पाहिले असतील व समयाहि ! त्या नामशेष झालेल्या कुठच्या भागांत हा तुकडा होता ? शयनगृहांत ! तेव्हां तेथें कोण कोण बरें राहून गेलें ! लज्जेनें मान खालीं घालणाऱ्या किती युवती ह्याने पाहिल्या ! किती रात्री व प्रातःकाल ! तेव्हां त्या घरांत कोणी गौरकाय रहात होते काय ? तर मग कुणा गौरकाय बालिकेची नाचणारी पावलेंहि ह्यानें झेलली असतील. झगे अथवा साड्या ह्यांच्या अंगावरून लोळत गेल्या असतील. **"स्ट्रॅण्ड"** वा **"मासिक मनोरंजनाचीं"** आवरणें ह्याने झेलली असतील. लोकमान्यांच्या स्वर्गवासानें हा कंपित झाला असेल. व भोसले, गंधर्वांच्या गाण्यानें पुलकित झाला असेल. पांचवे जॉर्ज व महाराणी मेरी अपोलो बंदरावर उतरली तेव्हां हा कुठल्या स्थळीं होता! बैठकींत, शयनगृहांत कीं भोजन-गृहांत? हा भोजनगृहाचा रहिवासी असेल तर किती अन्न प्रकारांचे सुगंध त्यानें कितीदां घेतले असतील ! त्यानें तृप्त झालेली माणसें पाहिली असतील. अतृप्त माणसें पाहिली असतील. सुखी माणसें व दुःखी माणसेंहि पाहिलीं असतील. ह्या तुकड्यानें किती व कोणती माणसें पाहिली असतील ? किती काळ पाहिली ? कोणकोणत्या प्रसंगांना हा साक्षीदार होता? तें घर प्रथम कोणीं बांधलें व नंतर तेथें कोण कोण राहून गेले! ते सारे कोठें गेले व त्यांचे शेवट काय झाले! त्या घराची वास्तुशांत होऊन किती वर्षें झाली? फार वर्षें लोटली असली पाहिजेत. कारण आज ती वास्तु कालबाह्य ठरली. उध्वस्त केली गेली. एका घराला वर्षानुवर्षें शोभा देणारा त्या घरांत नांदणारा हा तुकडा स्थानभ्रष्ट केला गेला व पोरकेपणानें ह्या येथें समुद्राच्या काठावर येऊन पडला आहे. दगड, गोट्या इतकेंच त्याचें आतां मोल. पण हा नक्षीदार सुंदर तुकडा एकेकाळीं एका नांदत्या घराचा भाग होता. आज जसा तो तुकडा मी सहज उचलून हातांत घेतला तसा तो तेव्हां घेतां आला नसता. तेव्हां तो कोणाचा होता. त्याचें कोणी होते. आतां येते जाते सहज त्याला तुडवून जातात, माझ्यासारखे कुतुहलानें त्याला निरखित रहातात. पण फार काळ मलाहि आतां तो दिसणार नाही. तें घर गेलें आणि तो तुकडाहि गेल्यासारखाच आहे.



हें माझ्या हातांत आहे तें त्याचें कलेवर ! केव्हांहि समुद्र तें घेऊन जाईल ! एखादें पोरटें त्याला पाण्यांत भिरकावील ! पण त्याचा असा शेवट होण्यापूर्वी मला फार फार वाटतें कीं, त्या चिनीच्या तुकड्याने एकदां तरी बोलावें, आपला इतिहास सांगावा ! मीच त्याला बोलते करावें. त्याला जाणावें ! त्याचा काळ; त्यानें पाहिलेलीं माणसें जाणावी असेंहि मला वाटते. आणि म्हणून जेव्हां जेव्हां मी त्या स्थळीं जातो तेव्हां तेव्हां माझें काळीज धडधडतें. मला वाटतें, बोलण्यापूर्वीच तो तुकडा मुक्यानें नष्ट झाला नाहीं ना !

•••




अनुक्रमणिका







जयवंत दळवी

# आमचें त्यावेळचें 'मॉंटेसरी' आणि पुढें...

मला आठवतें...

खमिसाच्या बाहीनें नाकाचा शेंबूड पुसतां पुसतां वयाचीं पांच वर्षें कशी झपाझप गेलीं. कशीं गेलीं धड तें कळलेंसुद्धां नाहीं. आणि एके दिवशीं प्रत्यक्ष शाळेंत जाण्याची न भूतो न भविष्यति अशी आपत्ति ओढवली.

चालू काळांत 'मॉंटेसरी' या परदेशी बाईच्या नांवाखाली पोराबाळांची जी चैन चालते ती त्यावेळीं उपलब्ध नव्हती. सध्यां मॉंटेसरीनें शोधून काढलेल्या शाळेंत पोरें जातात. हवा हवा तो खेळ खेळतात. दंगा–मस्ती करतात आणि पुनः वर चॉकलेटें, पेपरमिंटें खाऊन आईपेक्षां मॉंटेसरी बरी असें म्हणत घरीं येऊं शकतात.

दुर्दैवानें मी बराच लवकर जन्माला आलों होतों आणि त्या काळांत मॉंटेसरीसारखी चांगली बाई निपजली नव्हती. आपलें दुर्दैव, दुसरें काय ? शाळेंत जायचें, लगेच अक्षरें गिरवीत बसायचें आणि वेळींअवेळीं वेताच्या छडीचा मार खायचा हेंच आमच्या नशिबीं होतें त्या काळांत ! -

त्यामुळें शाळा म्हणजे आपत्ति ! हें समीकरण डोक्यांत पक्कें होतें.

ही आपत्ति एकदांची ओढवली.

एके दिवशीं रात्रीं विनायकबुवा भटजी आपला गंजलेला, काजळलेला कंदील हातांत घेऊन घरीं आले. अपुऱ्या तेलामुळें तो मधून मधून भकभकत होता. ते आले आणि सोप्यावर लोडाला टेकून बसले. आपला कंदील बारीक करून त्यानीं बाजूला ठेवला आणि आमचा कंदील पुढ्यांत ओढला. बंडीच्या खिशांतून फाटकें, लक्तरी पंचांग काढलें. एका भिंगाची चाळीशी नाकावर ठेवली. ( त्यांना उजव्या डोळ्यानें साधारण बरें दिसत असे !) आणि दोरीचे फेरे दोन्ही कानाभोंवती घेतले. विनायकबुवांचे हे सोपस्कार होईपर्यंत माझे वडील–आबा आले, आणि त्यांच्यासमोर बसले. मग ग्रहयोगावर खलबतें करीत उत्तमशा मुहूर्ताचा शोध सुरू झाला.

मला आठवतें, त्यावेळीं कुतुहल गोंजारीत मी बाजूलाच उभा होतो. त्यावेळच्या माझ्या आठवणीप्रमाणें आजोबांच्या तेराव्याचें जेवण कधीं घालावें हें सांगण्यासाठीं विनायकबुवा असेच एकदां रात्रीं पंचांगानिशी आले होते. आणि त्यानंतर एकदोन दिवसांतच गुळवणी–वड्याचे स्मरणांत राहील असें मस्त जेवण झडलें होतें. गांवातले किती तरी लोक पडवीत बसून जेवत होते. परसाबाहेर टाकलेल्या उष्ट्या पत्रावळी चाटण्यासाठीं कुत्र्यांचें केवढें तरी लटांबर केंकाटत होतें. पुनः एकदां विनायकबुवा आले आहेत. आजोबांचें आणखी एखादें तेरावें असेल का ? अशी कल्पना करीत गुळवणीनें भरलेला द्रोण मी माझ्या डोळ्यासमोर आणीत होतो.

तेवढ्यांत आकस्मिकपणें माझें नांव निघालें. माझें तेरावें ?—असा प्रश्न माझ्या बाल मनांत येतो न येतो तोंच माझ्या नजरेसमोरचा गुळवणीचा द्रोण फटकन् गळून पडला. कारण माझ्या नांवामागोमाग शाळेचाहि उल्लेख निघाला. सोमवारी सकाळीं दहा वाजून सदतीस मिनिटांनीं शाळेंत माझा प्रवेश झाला पाहिजे असें निर्दयपणें सांगून भटजीबुवा जायला उठले. ( जातांना पडशी-



अनुक्रमणिका

मध्यें नारळ आणि तांदुळ टाकायला ते विसरले नाहींत. पडशीतले चार तांदुळ परत सुपांत टाकायचेंसुद्धां त्याना सुचलें नाहीं !) घाईघाईनें उठले. उठतां उठतां पंचावर पाय पडून त्यांचा कासटा सुटला. (त्यांचा पंचाच सुटायला हवा होता. पण सुटला नाहीं. आणि तरीहि–) डोक्यावर संकटाचा चिरा असतांना सुद्धां केवळ सूड उगवण्यासाठीं म्हणून मी त्यावेळीं फिदकन् हंसलों.

'हस, हस ! उद्यां शाळेंत जातांना रडशील !" अशी शापवाणी ओकीत त्यानीं कंदील उचलला आणि ते निघून गेले.

आणि त्यांची शापवाणी खरी ठरली.

शाळा नको, शाळेंत जाणार नाहीं, असें म्हणत मी ओक्साबोक्सी रडण्यास प्रारंभ केला. आणि ती रडारड किमान आठवडाभर तरी चालू ठेवली. मला वाटतें, त्यावेळी मी एकूण जेवढा रडलों तेवढा पुढल्या आयुष्यांत कधीच रडलों नाहीं. नवीन कपडे, नवीन पाटी, नवीन पेन्सिल, नवीन अंकलिपी–कितीतरी प्रलोभनें मला दाखवण्यांत आलीं. पण मी कशाला भुललों नाहीं. रडणें थांबवलें नाहीं. रडत रडत आई, बाबा, आजी याच्याकडे आ वासून भेदरट नजरेनें पाहिलें. कधीं खरा रडलों, कधीं ओढूनताणून रडलों, सुक्या डोळ्यानीं, ओल्या डोळ्यानीं, जमल तसा रडलों. बाहूखालीं डोळे लपवून डोळ्याना थुंका लावत रडलों. आज, उद्या, परवां माझ्या सतत रडण्यानें घरी कुणी तरी द्रवेल असें वाटलें होतें. पण त्या रडण्याचा कुणावरहि फारसा परिणाम झाला नाही. आबा तर बेमुर्वतपणें हसूं लागले. मला वाटलं होतें, माझी आई माझें कौतुक करील. मला पाठीशी घालील. शाळेच्या संकटातून वाचवील, पण तसें काही झाल नाही.

पुढें पुढें मी रडताना आडवा पडूं लागलों. व्याकुळ होऊन गडबडा लोळूं लागलों. हेतु हा कीं आईचें मातृप्रेम द्रवूं लागल, पाटाशीं धरून ती गोंजारू लागल. तरीहि...

'चालत असता पडलों पाहुनी।
उचलाया मज येई धावुनी।
गोंजारी पोटाशीं धरूनी, ती माझी आई ॥

पुढें शाळेंत पाठ केलल्या आईवरील या गीताप्रमाणें कांहीं घडलें नाहीं. उलट, "मेल्या डुकरासारखे लोळतंय कित्यांक ?" असें म्हणत तिनें पाठींत धपाटेच तेवढे घातले.

त्यामुळें पुढें—

'स्मरण तुझ्या ममतेचें होई।
तव उपकारा सीमा नाहीं।
कैसा होऊं मी उतराई,
गे माझे आई ॥'

असें म्हणण्याची पाळी माझ्यावर आली नाहीं.

नाहीं म्हणायला माझी आजी तेवढी माझ्या साहाय्याला धावून आली. (जुनीं माणसेंच अधिक चांगली असें जेव्हां आज मी सरधोपट विधान करतो तेव्हां त्यामागें आजीच्या उपकाराचे धागेदोरे असावेत असें मला वाटतें !) शिकून सवरून करायचें आहे काय असें ती त्यावेळीं जीव तोडून म्हणाली. घरचा वाडवडिलार्जित जमीनजुमला आहे, शेतीभातीवर नजर ठेवून राहील आणि आपलें



आजोबांचें आणखी एकादें तेरावें असेल का ? कल्पना करीत गुळवणीनें भरलेला द्रोण मी माझ्या डोळ्यासमोर आणीत होतो.

पोट भरील असें ती उठता बसता म्हणत राहिली. (पुढच्या काळात कुळकायदा येईल याची बिचारीला कल्पनासुद्धा नव्हती !) शिकून सवरून खायचें काय ? शिकून का कुठे पोट भरतें ? शिकून सवरून शेवटीं मास्तराचाच मार खायचा ना ? ती अशिक्षित म्हातारी असूनसुद्धां अभ्यास म्हणजे छडी हें समीकरण तिला ठाऊक होतें. 'छडी लागे छमछम। विद्या येई घमघम।' या तत्कालीन म्हणीचा परिणाम असेल कदाचित् ! (मास्तर जेवढा अधिक मारका तेवढा तो अधिक चांगला असेंहि त्यावेळीं वाडलधाऱ्यांचें शिक्षणविषयक मत असे ! असो बिचारे !)

*गेल्या अंकापासून सुरू झालेली ही विनोद–माला 'जत्रेंतील पात्रें' वाचकांना अत्यंत आवडल्याचें दीपावलीकडे रोज येणाऱ्या पत्रांवरून दिसतें.*

*महाराष्ट्राचे नव्या दमाचे विनोदकार श्री. जयवंत दळवी, वाचकांच्या उंचावलेल्या अपेक्षा पूर्ण करतील असेंच खुसखुशीत आणि एकाहून एक सरस असे लेख या ललित लेखमालेंतून यापुढें दीपावलींतून क्रमशः प्रसिद्ध होतील.*

तथापि त्या समजस म्हातारीचें कुणी कांहीं ऐकलें नाहीं. जिनें आबांना जन्म दिला तिचेंहि ऐकायला ते तयार झाले नाहीत. ('आई थोर तुझे उपकार' हें गीत त्यानीं आपल्या बालपणीं पाठ केलें नसावें !) पण आजीहि नाहीं म्हटलें तरी चिवट होती. "शिकणां शिकणां म्हणजे भिकार विन्द्या" असें म्हणत ती घरभर फिरली. माझें रडें थांबावें म्हणून मला समजावूं लागली. "तूं चिन्ता नका करूं. तुला कोण शाळेत घालता बघूं या !" तिनेंहि तडक आव्हान स्वीकारलें.

पण सारेंच फुकट.

माझें रडणें जसें घरांत कुणी मनावर घेतलें नाहीं, तसें आजीचें बोलणेंहि कुणी कानावर घेतलें नाहीं.

अखेर फिरून एक प्रयत्न म्हणून 'सरस्वती आयली कीं घरातून लक्ष्मी जातली" असें एक आर्थिक सत्य तिनें आबांच्या कानीं घातलें. पण आबांचा चंग अभंगच राहिला.

त्यामुळें आजी अतोनात अस्वस्थ झाली.

आजी अस्वस्थ होण्याचें आणखी एक खाजगी कारण होतें.

कोठीच्या खोलीत एका कोपऱ्यातल्या खिडकीत बसून चारून विड्या ओढायची तिला संवय होती. तिला अधून मधून बारक्या विड्या (लाल धागा) आणून देण्याचें चारटें काम माझ्याकडे लागलेलें होतें. बुध्या रावताच्या दुकानात, मला आठवतें, त्यावेळीं एका पैशाला सहा विड्या मिळत असत. आणि शवकाडाचे लाडू एका पैशाला चार







मिळत असत. आजीनें थरथरत्या हातानें माझी मूठ दाबली कीं तांब्याचें गरम नाणें माझ्या हाताला लागे. त्या एका पैशांत तीन विड्या आणि दोन लाडू घेऊन मी घरीं येई. त्यामुळें पैशाला तीन विड्या मिळतात असा काळा–बाजारी दर आजीच्या हिशोबी लावणें मला भाग पडलें होतें. घरीं येईपर्यंत रमत गमत दोन लाडू चघळत खायचे आणि वर गवताच्या दोन काड्या चावत सावळसूदपणें कोठीच्या खोलींत जायचें आणि खिडकीच्या वरच्या कोपऱ्यांत विड्या ठेवून मांजराच्या पावलानें बाहेर पडायचें हें एक अंगवळणी पडलेलें काम होतें. दिवसांतून दोन तीनदां तरी हें काम करावें लागत असे. आणि लाडवांचा वास तोंडाला येऊं नये म्हणून गुरांसारखा गवताचा रवंथहि करावा लागत असे. कारण आजी तशी संशयी होती. पैशाला तीन विड्या हा दर तिला महाग वाटत असे. आणि शंकेचें निरसन करण्यासाठीं अधूनमधून छापा घातल्याप्रमाणें माझे दंड पकडून ती माझ्या तोंडाचा वास घेत असे. पण तिचें विड्या ओढण्याचें काम चोरून होत असल्यामुळें बुल्याच्या विड्यांचा दर काय हें तिला कधींच कुणाला उघडपणें विचारतां आलें नाहीं.

मी शाळेंत गेलों तर विड्या आणून कोण देणार अशी एक चिन्ता तिच्या मनांत घर बांधत होती. "तूं पोरा शाळेंत गेलंय तर माझ्या विड्यांचा रे काय?" असेंहि ती दबलेल्या चोरट्या आवाजांत म्हणायची. आणि विड्या आणण्याचें काम केलें नाहीं तर शेवकांडीचे लाडू कसे खायचे असा प्रश्नहि माझ्या मनांत बाळवीसारखा चिकटून रहायचा. एकदम एका दिवसापुरत्या दोन तीन पैशाच्या विड्या आणून ठेवण्यास आजीचे मन धजत नसे. एकदम एका वेळीं तीन पैसे खर्च करायचे म्हणजे काय!–आणि एकदम तीन पैशाच्या विड्या आणणेंहि माझ्या पथ्या-वर पडण्यासारखें नव्हतें. कारण बुल्यानें कडक गुळ वापरून तयार केलेले शेवकांडीचे लाडू कडाकड फोडून खायचे म्हणजे दांत पडताहेत कीं लाडू फुटताहेत हेंहि धड कळत नसे. त्यामुळें बुल्याच्या दुकानापासून घरीं येईपर्यंत पांच सहा लाडू खाऊन संपवणें कठीण होतें. दोन लाडू कसेबसे खाऊन व्हायचे. त्यामुळें तीनदां विड्या आणणं हें मला अधिक सोयीचं होतं.

थोडक्यांत, विड्यांच्या विचारानें आजी आणि लाडवांच्या विचारानें मी विद्यार्जनाच्या विरुद्ध होतो.

पण घरांत मला आणि माझ्या आजीला अजिबात महत्त्व नव्हतें. एक पोर आणि दुसरी म्हातारी! विचारतो कोण!

"शिक्षण नको खरा, पण खंडाच्यो पावत्यो लिण्यापुरतां तरी शिक्षण होयां!" एक चपखल युक्तिवाद करीत आबांनीं आपला हट्ट अखेरीस तडीस नेला.

सोमवार उजाडला.



'शिवाजी महाराजांचें बालपण' या विषयावर लिहितांना आमच्याच वयाचा पण भरगच्च दाढी-मिशा असलेला शिवाजी नजरेसमोर येई.

दहा वाजत आले.

आबा म्हणाले, "आपू, शहाण्यासारखो शाळेंत चल..."

पण आपू ऐकणारा नव्हता.

मी जबरदस्त धांगडधिंगा घातला. मी असा धिंगाणा घालणार हें बहुधा आबांना ठाऊकच होतें. म्हणून त्यांनीं आडदांड प्रकृतीच्या दादुल्याची खास योजना केली होती. मीहि तसा कमी हट्टी नव्हतो. गडबडा लोळलों. चिक्कार लाथा झाडल्या. पण दादुल्या तरी कुठें कमी होता! त्यानें मला बगलेंत पकडलें. जसा काहीं तो माझी मुंडी पिरगळण्याच्याच कामावर होता. पण मीहि क्षणभर तरी डरलों नाहीं. मी माझीं नखें बाहेर काढली आणि दादुल्याचें केसाळ पोट खूप ओरबाडून काढलें. पण तो कसला ऐकतो! आंब्याच्या झाडावर आंबे उतरण्या-साठीं चढल्यावर लाल मुंगळ्याकडून चावून खाऊन घ्यायची त्याला संवय. त्यानें मला सपशेल उलटा केला आणि लांडी विजार वरून खाली ओढली, कशीबशी कमरेंत अडकवली. अशा ताकदीच्या जोरावर पहिलें वस्त्र अंगावर चढतांच मी अर्धामुर्धा नामोहरम झालों. तेवढ्यांत आबांनीं खालून खमीस चढवून तें वर ओढलें. आज घालूं, उद्यां घालूं म्हणतां म्हणतां तंग आखूड झालेला कोट माझ्या अंगावर जबरदस्तीनें चढवला गेला. तो कोट इतका तंग होता कीं तो अंगांत चढवतांच मी जवळ जवळ पुरता जखडला गेलों. मला हालचाल सुद्धां करणें कठीण झालें. तेवढ्यांत आईनें जरीची वेलबुट्टी असलेली मखमली टोपी आणली. दादुल्यानें ती डोक्यावर ठेवली आणि वर मुठका आपटला. त्याबरोबर टोपी भुवयावर आली आणि मी जवळपास आंधळाच झालो. अशा रीतीनें खुद्द पोषाखांतच मी जायबंदी झालों. वेषांतच आवेश मेला. तेव्हां दादुल्यानें विसर्जनासाठीं गणपति उचलावा तसा मला वर उचलला. नाहीं तरी प्रति वर्षीं आमचा गणपति आणण्याचें आणि पोंचवण्याचें काम तोच करायचा.

पाटी–पेन्सिलीची पिशवी आणि बसायचा गोणपाट घेऊन आमचा नाऱ्या गडी गणपतीचीच वाट बघत अंगणांत उभा होता. आजपर्यंत आमच्या घरांत अनेकांचें जें थोडें-फार शिक्षण झालें त्या सर्वांच्या पाटी–पेन्सि-लीच्या पिशव्या आणि त्यांचे गोणपाट शाळेंत पोंचवायचें काम याच नाऱ्यानें केलें होतें.

शेवटीं दादुल्यानें माझी मोटली शाळेच्या दरवाजासमोर आणली. शाळा आमच्या घरा-समोरच होती. एक अखेरचा प्रयत्न म्हणून अंगांत उरलेली सारी ताकद एकवटून मी दंगाधडपड करीत होतो. पण एकशेंपस्तीस नारळांची गोणी लीलेनें उचलणारा दादुल्या माझी कसली पर्वा करतो! माझी सारी धडपड हंसत पहात तो शाळेच्या दारासमोर उभा राहिला. कारण तोपर्यंत फक्त साडेदहाच वाजले होते. विनायकबुवांच्या मुहूर्ताप्रमाणें अजून सात मिनिटें बाकी होती. मला अखेरची धडपड करायला आतां फक्त सातच मिनिटांचा अवधि होता. खिशांतलें स्लेट्खळीचें घड्याळ तळ हातांत धरून आबाहि शाळेच्या दारापाशीं उभे होते. राहिलेली सात मिनिटें मी ओरडून



अनुक्रमणिका

घेत होतो, किंचाळून किंचाळून आकाशपाताळ एक करीत होतों. नाऱ्यानें आंत जाऊन गोणपाट हांथरून ठेवला होता. जमीनदाराचा पोरगा म्हणून बाकीच्या पोरांना खाली हटवून पहिल्या नंबराला माझा गोणपाट लावण्यांत आला होता. दरम्यान सारीं पोरें आणि मास्तर खिडक्यांत झुंबड करून गंमत पहात होती. त्यांना गंमतच ती !

या साऱ्या गडबडींत अखेरीला दहा सदतीस वाजलें. दरवाजावर आडवा धरलेला हात आबांनीं खालीं केला आणि दादुल्यानें गणपति आंत नेला आणि जवळ जवळ श्रीचें विसर्जन करावें तशा पद्धतीनें त्यानें मला गोणपाटावर आपटलें.

त्यानंतर आबा आणि नाऱ्या घरीं गेलें. मीहि नाकावर उलटा सुलटा हात मारीत नाइलाजास्तव लढा मागें घेतला. हतबल होऊन आसनमांडी ठोकली. शाळेकडे आबा आले होते म्हणून लावलेलीं कोटाची बटणें सोडत बागाईतकर मास्तर पुढें आले. वेताची छडी टपटप हालवित म्हणाले, "उभा रहा बरें ! "

मी उभा राहिलो. उभा राहून श्रीगणेशा काढावी लागते कीं काय या विचारांत असतांनाच बागाईतकर मास्तर म्हणाले, "तुमानीची बटणें लाव बघूं. नाहीतर पोस्टाची पेटी समजून आत पत्रें पडायचींत !"

सारीं पोरें खदखदां हंसलीं. तेव्हां मास्तरनीं फक्त लिंबाएवढाले डोळे वटारले आणि हातातली छडी अधिक जोरानें हलविली. मग पोरें गप्प बसली.

तुमानीची बटणें लावण्याआधीं क्षणभर पळ काढण्याचा एक विचार मनांत आला. पण पळ काढणें शक्य नव्हतें. मास्तराच्या हातीं छडी होतीच. पोराची वानरसेना होती. तीहि त्यानीं अंगावर सोडली असती. शिवाय सर्वांत मोठें संकट म्हणजे शाळेच्या पायरीवर दादुल्या काळाकुट्ट दगड बसल्यासारखा बसून होता.

सतत आठ दिवस तो असा बसून होता. ओंडका टाकल्यासारखा बसून असायचा. मधूनमधून पेंगत डुलक्या खायचा आणि वाऱ्यानें सुद्धां दरवाजा हलला तरी एकदम सताड डोळे उघडून चौफेर बघायचा. या एवढ्या कामाबद्दल त्याला रोज एक नारळ



मिळायचा. शिवाय आपू कसा पळायच्या बेतांत होता आणि आपण कसे डोळे वटारले वगैरे काल्पनिक कथा आईला सांगून चोर आणखी पेजहि पोटांत ढकलायचा.

अखेर आठ-दहा दिवसांच्या संवयीनें मी शाळेंत रुळलों. सुतासारखा सरळ आलों. श्रीगणेशावर हात बसला. पाटीवर कोळसा उगाळून ती काळीकुट्ट करण्यांत वेळ जाऊं लागला. अंकलिपींत करवतीचें पान ठेवून त्या पानाच्या कंगोऱ्यांत कसें कोंब फुटतात तें पहाण्यांत गंमत वाटूं लागली.

मास्तरांकडून अधूनमधून पाठींत सपकन छडी ओढून घेणें, कान पिरगळतांच डोळ्यां-समोर सूर्याचीं पिल्लें पहाणें, डोक्यावर उलटी मूठ बसतांच नजरेसमोर अंधार बघणें, एक ना दोन साऱ्या सजा भोगतां भोगतां दिवस जाऊं लागले.

पावटे मास्तर शाळेंतून जातांच नरू पुनः माझ्या शेजारी बसूं लागला. माझ्या सबंध

जीवनांत नरूइतका जिवाभावाचा दुसरा मित्र मला कोणी नव्हता. या घटकेलाहि मला शाळेची आठवण आली कीं प्रथम नरूची आठवण येते. नरूचें चित्र डोळ्यासमोर उभें रहातें.

नरू कुळवाड्याच्या कुळांत जन्माला आला होता तरी तो बामणाच्या पोरासारखा दिसायचा. गोरा गोमटा. तरतरीत लांब नाक. निमुळता आणि हंसमुख चेहरा. आपल्या पांढऱ्या टोपीखालून आपली शेंडी नेहमी बाहेर लोंबती ठेवायचा. आम्ही अनेकदां चेष्टेनें त्याची शेंडी ओढत असूं. पण तो कधीं हटला नाहीं. "शेंडी आसा तर ती लोकांक दिसूक नको?" असें तो विचारायचा. तेंहि त्याचें खरेंच होतें. शेंडी आहेच तर ती लोकांना दिसायला नको?

अगदीं प्रथमपासून नरू आणि मी वर्गांत शेजारी शेजारी बसत असूं. आम्ही मधून मधून बोलत असूं म्हणून पावटे मास्तरांनीं आमच्या जागा बदलून टाकल्या होत्या. पण पावटे मास्तर जातांच आम्ही आमचे गोणपाट पुनः एकमेकांस जोडले. आम्ही दोघेहि पुनः पुनः नापास होत असूं म्हणूनहि असेल कदाचित्, पण आमची दोघांची मैत्री दीर्घकाळ टिकून राहिली होती. सुरवातीपासून अखेरपर्यंत ती टिकून राहिली. अनेकदां माझ्याच गोणपाटावर चक्क आपलें नांव घालून तो माझा गोणपाट आपल्या मालकीचा करून टाकीत असे. आणि मी तकार केली तर भात जास्त जेव, म्हणजे तांदुळ संपतील आणि गोणपाट रिकामा होईल असा तो मला सल्ला देत असे.

अभ्यासांत आमची दोघांची तुलना केली तर नरूच्या मानानें मी थोडा अधिक हुशार होतो. त्यामुळें परीक्षेच्या वेळीं बगळ्यासारखी मान उंच करून माझ्या खांद्यावरून जें कांहीं माझ्या पाटीवर दिसेल तें आपल्या पाटीवर उतरून तो वेळ मारून नेत असे. निकाल लागला कीं आम्ही दोघेहि नापास होत असूं आणि मग "तुझा बघून काढला म्हणून मी नापास झालंय!" असें म्हणत आपल्या अपयशाचें खापर तो माझ्याच डोक्यावर फोडीत असे. आणि तरीहि आमची गाढ मैत्री अखेरपर्यंत अबाधित राहिली होती.

खरें सांगायचें म्हणजे नरूचें अभ्यासावर असावें तसें लक्ष नव्हतें. अनेकदां तो दांड्या मारायचा. त्यानें दांडी मारली कीं मी त्याच्या आईला बातमी देत असे. आणि मग त्याला शिव्या देत त्याची शेंडी पकडून ती त्याला फरपटत शाळेंत आणीत असे. बिचारी विधवा होती. वर्षाला चार रुपये खंड देऊन तिनें वामनदार्जीचा एक कुणगा आपल्याकडे ठेवला होता. त्याच कुणग्यांत तिचें खोपट होतें. घराभोंवतीं आठ–दहा माड होते. त्या माडाचे नारळ पाडून, चुडतांचीं झावळें करून आणि माडांवर चढवलेल्या पानवेलींचीं पानें विकून ती कशीबशी गुजराण करायची. नरू तिचा एकुलता एक पोर. तिच्या साऱ्या आशाआकांक्षा त्या नरूवर एकवटून राहिल्या होत्या. नरू भराभर फायनलपर्यंत



दोन्ही हातांनीं धोतर वर करून मांड्या खाजवीत पावटे मास्तर गर्जू लागले, "कुठें आहे तो ××× चा?"

शिकेल, गांवच्याच शाळेंत हेडमास्तर होईल, हेडमास्तर झाला कीं पोस्टमास्तरहि होईल आणि चार पैसे हातीं घोळतील असा भोळाभाबडा विचार ती मनांत खेळवित असे. नरूचा बाप लाकूडतोड्या होता. मोठमोठ्या झाडावर चढून तो झाडे तोडायचा. एकदां असाच झाडावर चढला असतां तो पडून मेला. देवाधर्माचें झाड तोडायला गेला म्हणून झपाटून पडला आणि मेला असें निदान झालें. आपलें चिरेबंदी कौलारू घर असावें अशी त्याची इच्छा होती. ती अपुरी राहिली. त्यासाठीं तो स्वप्नांत येतो असें सांगत नरूची आई ढसाढसा रडायची. नरू हेडमास्तर, पोस्टमास्तर झाला म्हणजे तो चिऱ्याचें घर बांधील अशी ती आशा बाळगून होती. म्हणून नरूच्या शिक्षणासाठीं तीळतीळ जीव तोडायची. पैशाची पुढें कमतरता पडूं नये म्हणून पन्नास रुपये जमले कीं ते कुणाकडे तरी ठेवायला द्यायची.

पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं नरू शिकला नाहीं. अभ्यासांत फारसें लक्ष त्यानें घातलें नाहीं. खरें म्हणजे तो चौकस बुद्धीचा होता. पण त्याच्या चौकस बुद्धीला वळण देणारा त्याला कुणी भेटला नाहीं. हीं कुळवाड्याचीं पोरें शिकून शिकणार काय? चार बुकें शिकतील आणि शाळा सोडून घरीं बसतील असेंच मास्तर गृहित धरीत असत. आणि अनेकदां तसेंच होत असे. नरूनेंहि पुढें तसेंच केलें.

अभ्यासांत त्यानें कधीं लक्ष घातलेंच तर त्याचें शंकाखोर मन सर्वांच्या पुढें धांवत असे. एकदां 'शिवाजी महाराजांचें बालपण' या विषयावर दहा ओळी लिहिण्याचें काम आमच्या नशिबीं आलें. शिवाजी महाराज घोड्यावर कसे बसत असत, तलवार कसे चालवीत असत, मावळ्याना शस्त्रें चालविण्याचें शिक्षण कसें देत असत आणि किल्ले कसे बांधीत असत याचीं चित्रें आम्हीं डोळ्यासमोर घोळविलीं. वयानें आमच्या एवढा लहान, पण भरगच्च दाढीमिशी असलेला आणि रत्नखचित टोप मस्तकी घातलेला बाल शिवाजी आमच्या नजरेसमोर आला. त्याच्या बहादुरीचें वर्णन दहा ओळींत पूर्ण करण्यासाठीं मी पाटीवर पेन्सिल टेकविली मात्र– आणि दबलेल्या आवाजांत नरू माझ्या कानांत पुटपुटला, "शिवाजी बालपणातच महाराज कसा झाला?" त्याच्या शंकेनें मला हंसूं आलें. पण हसण्यांत वेळ दवडणें शक्य नव्हतें म्हणून मावळे, ढाल–तलवारी, किल्ले, घोडे या सर्वांना मी दिमतीला धरलें. पण नरूचा निबंध मात्र थेट वेगळा झाला–शिवाजी लहानपणीं भयंकर खोडकर होता. तो गुरें घेऊन डोंगरावर जात असे. काजूच्या झाडावरचे बोंडू तोडून खात असे. दुसऱ्याच्या झाडावर दगड मारून कैऱ्या पाडीत असे. उन्हातान्हांत भटकल्यामुळें त्याला तहान लागत असे. मग तो आईकडे पाणी मागत असे. कैऱ्यावर पाणी प्याल्यामुळे रात्री खूप खोकत असे. आणि मग आई त्याला शिव्या घालीत असे...... अशा प्रकारें आपलेंच बालपण लिहिल्यासारखें तो शिवाजाचेंहि बालपण लिहून माकळा झाला. आणि त्याबद्दल अमृते मास्तरकडून

अनुक्रमणिका

सपाटून मारहि खाल्ला त्यानें. "भामटा शिवाजी महाराजांबद्दल अनादरानें लिहितों–" असें म्हणत अमृते मास्तरानीं त्याचें डोकें दगडावर दगड आपटावा तसें भिंतीवर आपटलें होतें. आणि भिंतीला पाठ टेकून उभे रहाण्याची खुर्चीची सजा दिली होती. "हिंदुपदपादशाहीचें शिवाजी महाराजानीं संरक्षण केलें याचें तुला कांहींच कसें नाहीं!" असेंहि त्यांनीं नरूला विचारलें होतें.

पण त्याबद्दल नरूला कधींच पश्चात्ताप झाला नव्हता. आपण जें लिहिलें त्यापेक्षां बालपणांत निराळें असें शिवाजीनें कांहीं केलें असेल असें त्याला कधींच वाटलें नाहीं. आतां मी विचार करतों, तेव्हां मलाहि त्याचें म्हणणें पटूं लागतें. शिवाजी दहा वर्षांचा असतांना त्यानें खरोखरच दुसरें काय केलें असेल?— पण सत्य लिहून नरूनें मार तेवढा खाल्ला!

गणिताच्याहि तासाला अशीच झटापट व्हायची.

एका हौदांत चौदा बादल्या पाणी ओतलें आणि त्यांतलें तीन बादल्या पाणी गळून गेलें तर हौदांत किती बादल्या पाणी राहिलें?' हें बागाईतकर मास्तरांचें आवडतें गणित! पुनः पुनः तोच गळका हौद आणि तेंच पाणी. फक्त आज चौदा बादल्या पाणी टाकलें तर उद्यां पंचवीस बादल्या. आज तीन बादल्या पाणी गळलें तर उद्यां अकरा बादल्या पाणी गळलें एवढाच फरक, पण हौद हा गळलाच पाहिजे.

पण हें गणित वजाबाकी करून सोडवण्याऐवजीं नरूला एकामागून एक अशा शंका येत. हौद गळका असला तर त्यांत मुद्दाम विहिरींतून काढून चौदा बादल्या पाणी कोण ओतणार? आणि जो एकामागून एक चौदा बादल्या पाणी ओततो तो हौदाची तोटी नीट केल्याशिवाय कसा ओतील? आणि बरोबर किती बादल्या पाणी गळलें हें कसें कळणार? तोटींतून गळलें म्हणावें तर एक बादली गळतांच पाणी ओतणारा इसम तोटी कां बंद करीत नाहीं?

अशा एकापेक्षां एक रास्त शंका डोक्यांत आल्यामुळें हें वजाबाकीचें गणित आहे हें बिचाऱ्याच्या लक्षांत सुद्धां येत नसे.

'माझ्या घरीं एका भांड्यांत सात शेर दूध आहे. तें तीन भांड्यांत सारख्या प्रमाणांत घालायचें असल्यास प्रत्येक भांड्यांत किती

# युद्धस्य कथा

## बहादुर ब्रिगेडियर

*[पुराणेतिहासांतल्या काल्पनिक युद्ध-कथा वाचतांना क्षणभर आपण विस्मयानें थक्क होतों. मग विसाव्या शतकांतील आधुनिक शस्त्रास्त्रांनीं लढलेल्या युद्धांतील प्रत्यक्षानुभव जर आपणाला कुणी सांगितले तर आपल्या अंगावर रोमांच उभे राहिल्याशिवाय रहाणार नाहींत.*

*प्रस्तुत लहान लहान कथा भारतीय फौजेंतील एका उच्चपदस्थ सेवानिवृत्त अधिकाऱ्यांनीं खास दीपावलीसाठीं लिहून पाठविलेल्या आहेत. लेखकानें त्या स्वतः अनुभवलेल्या आहेत. कांहीं घटनांत स्वतः लेखक असल्यामुळें त्या वाचतांना क्षणभर श्वासहि रोधावा यांत नवल नाहीं...]*

जम्मू-काश्मीरच्या लढाईची गोष्ट. पाकिस्तानी फौजा आणि सरहद्दी कबाइली यांना जम्मूच्या पूंच राज्यापैकीं बऱ्याच भागावरती ताबा होता. त्यापैकीं एका टेकडीवर पाकिस्तानी तोफा सज्ज ठेवण्यांत आल्या होत्या. त्या तोफा आपल्या तोफांच्या माऱ्याबाहेर असून त्यांचे गोळे राजोरी जवळ तयार केलेल्या एका तात्पुरत्या विमानतळावरती नेमके पडत होते. त्यामुळें रसद, कुमक, शस्त्रास्त्रें व इतर युद्ध सामुग्री आणणाऱ्या हिंदुस्थानी हवाई दलाच्या विमानांना तेथें उतरणे अशक्य झाले होते.

ह्या कारणामुळें काहीहि झाले व कितीहि प्राणहानि सोसावी लागली, तरी त्या टेकडीवर हल्ला करून ती हस्तगत करावयाचें ठरलें.

सर्व तयारी झाली व मोठ्या प्रमाणावर हल्ला करण्याकरितां सर्व सज्ज झाले. तो हल्ला एका अनुभवी, धाडसी व कुशल ब्रिगेडिअरच्या नेतृत्वाखाली योजिला गेला होता.

हल्ला होणारी टेकडी २-३ मैल दूर होती आणि ब्रिगेडिअरसाहेब आपल्या दुर्बिणींतून हल्ला करण्याचे आधी एकदा अखेरचे निरीक्षण करीत होते. पहातां पहातां त्यांना शंका आली व त्यांनी आपल्या हाताखालच्या माहिती खात्याच्या अधिकाऱ्याला विचारले कीं शत्रूची काय खातमी आहे? त्याने सांगितलें कीं नवीन बातमी कांहींच नाहीं पण रात्रीच्या बातमीप्रमाणे शत्रू टेकडीवर दबा धरून बसलेला आहे.

ब्रिगेडिअर साहेब म्हणाले, " काय असेल ते असो पण मला कांहींच हालचाल टेकडीवर दिसत नाहीं व शत्रू रातोरात टेकडी सोडून जाण्याचीही शक्यता आहे. तेव्हां मी असें करतों कीं मी एकटाच जाऊन पाहातो. माझ्यावर जर गोळीबार सुरू झाला तर मी तेथेंच आडोशाला राहीन व तुम्ही हल्ला सुरू करा. "

त्यांच्या हातखालच्या सर्व अधिकाऱ्यानी ब्रिगेडिअर साहेबांना एकटे जाण्यापासून परावृत्त करण्याचीं पराकाष्ठा केली पण त्यांचा निश्चय अटळ राहिला. ते म्हणाले, "मी माझ्या संरक्षणाकरिता २५–३० माणसें घेऊन गेलों आणि शत्रू तेथे असला तर आपली हल्ला करण्याची योजना उघडकीस येईल आणि नंतर हल्ला करणें महागांत पडेल. पण मी जर एकटाच गेलो तर मला लपत छपत जाता येईल आणि मी सहजासहजी दृष्टीस पडणार नाहीं. तसेंच वेळहि वाचेल आणि त्याशिवाय इतक्या शिपायांचे आयुष्य, धोक्यात घालण्याऐवजी मला स्वतःला जरी जिवावर बेतण्याची शक्यता असली तरी चालेल.

नंतर हे बहादुर ब्रिगेडिअर आपल्या एका विश्वासू शरीरसंरक्षकाला घेऊन निघाले. सर्व फौज हें धाडस जीव मुठींत धरून पहात होती. मिळेल त्या आडोशाचा फायदा घेत व कधी पळत तर कधी भुईसरपटत ही दुक्कल डोंगराचे पायथ्यापाशी पोहोचली. तेथून ब्रिगेडिअर साहेब वायरलेस सेटवरती अभिमानाने सांगतात. " अरे भाई. आजाव सब आजाव और जलदी आजाव. यहां तो कोई भी नहीं. मैंने कहा था वो ठीकहि था. "

ह्या बहादुर ब्रिगेडिअरला मानसन्मान तर मिळालाच पण कानउघडणी करून कांहीं फायदा नाहीं व हे राजेश्री पुन्हा आपला जीव धोक्यांत घालतील ह्याची शाश्वति नसल्यामुळें त्यांची तेथून बदली करण्यात आली.

[ या सर्व सत्यकथा असल्यानें अर्थातच मूळची नांवे बदलून काल्पनिक नांवे दिलेली आहेत. स्थळांचा निर्देश मात्र सत्य आहे. ]

---

दूध घालावें लागेल ?' हें बागाईतकर मास्तरांचें दुसरें आवडतें गणित. आपल्या घरीं उभ्या आयुष्यांत कांहीं एवढें दूध येणार नाहीं याची त्यांना पुरेपूर खात्री होती, म्हणून माझ्या घरीं एका भांड्यांत अशी सुरुवात करून तें दुधाचें काल्पनिक सुख उपभोगीत असत.

हें गणित ऐकलें कीं नरू तुच्छतेनें हंसायचा. हळूच म्हणायचा, ' यांच्या घरांत सात शेर दूध ! सात शेर पाणी गावतांना मारामार!'

आणि मग प्रत्यक्ष गणितांत डोकें खुपसतांच त्याला पुनः शंका यायच्यात. एकाच घरचे दूध ना ? मग तें तीन भांड्यांत वांटून आणखी दोन भांडी कशाला खरकटीं करायचीं ? आणि मग तीं घांसणार कोण ?

या व्यवहारांतल्या शंका त्याला बेहिशोबी गणितें सोडवायला कधींच उपयोगी पडल्या नाहींत. त्यामुळें त्याच्या पाटीवर नेहमींच भोपळा ठेवलेला असे ! त्याच्या शंकांचें कोणी कधीं निरसन केलें नाहीं. उलट तो 'ढ' आहे म्हणून त्याला इतर कामें सांगण्यांत मास्तरांचा वेळ जाऊं लागला आणि तीं कामें करण्यांत नरूचा शिक्षणाचा वेळ खर्चीं पडूं लागला.

" ए, नरू, मेल्या तूं काय शिकणार ? जा एक पैशाची तपकीर घेऊन ये. " नाकावर मूठ फिरवीत अमृते मास्तर काम सांगायचे.

" नरू, उठ–उठ ! मोठा पाटी घेऊन बसला आहे. जंटलमन होणार ! जा–बाजारांत मासळी आली आहे का बघून ये. असली तर दोन पैशांचे पेडवे आण. " असलें एखादे काम बागाईतकर मास्तरकडून मिळायचें. मग नरू बाजारांत जायचा. दोन आण्याचे पंधरा–वीस पेडवे घेऊन यायचा. येतांना त्यांतलें चारसहा पेडवे आपल्या घरीं आणून टाकायचा. आणि बाकीचे बागाईकर मास्तरांच्या घरीं.

" आतां पेडवे आणलस तर नीट तरी करून दी–" बगाईतकरांची कारभारीण आणखी काम द्यायची.

मग केळीच्या झाडाच्या मुळापाशीं विळी घेऊन नरू पेडव्यांनी खवलें काढीत बसायचा विहिरीचें पाणी काढून मासे स्वच्छ धुवायचा. मनांतल्या मनांत शिव्या मोजीत मीठ–मसाला लावायचा आणि मग खवचटपणें विचारायचा " आतां तळून देव मासे ?"

पण तो खवचटपणा बागाईतकरांच्या कारभारणीला कधींच कळत नसे. ती एकदम चिडचिडत म्हणायची, " होय तळून ! तेल आणलास तुझ्या बापान् !"

मग मनांतल्या मनांत तिला शिव्या देत आणि हाताला येणारी मासळीची हिंवसाण हुंगत नरू परत शाळेंत यायचा. तोपर्यंत शाळा सुटलेली असायची. बहुतेक पोरें आपापलीं दप्तरें घेऊन घरीं गेलेलीं असायचीं. आणि विकलेल्या कार्डा–पाकिटाचे हिशोब करीत एकटे बागाईतकर मास्तर शाळेंत बसलेले असायचे.

" मेल्या; बाजारांतून मासळी आणायला एवढा वेळ ? पेडवे मोजून तरी घेतलेस ? आणि वर दोन घेतलेस कीं नाहीं मागून ? "

" घेतलें तर–" नाक खाजवीत नरू म्हणायचा. बोलतांना नाक खाजवण्याची त्याला खोडच होती.

" आतां नाक खाजवीत उभा राहूं नकोस ! तुझें हें दप्तर कोण तुझा बाप सांभाळणार ? तुझ्यापायीं मला इथें बसावें लागलें ! आतां आला आहेस तर पैशाच्या विड्या घेऊन ये जा. धांवत जा आणि पळत ये. मला आतां बसायला वेळ नाहीं !

नरू धांवत जायचा आणि विड्या घेऊन पळत यायचा ! आणि मग आपली धोपटी पाठीवर टाकून पळत सुटायचा. पायांत चप्पल नसल्यामुळें तापलेल्या मातींत त्याचे पाय भाजायचे. त्यामुळें पळत घरीं जाण्याव्यतिरिक्त गत्यंतरच नसे. पण हें सारे कष्ट करतांना त्याला एकच समाधान मिळायचें. या कामामुळें मास्तर मला परीक्षेंत वर चढवतील एवढीच त्याला आशा वाटायची. अर्थात तो क्रमानें वर चढला नसला तरी सात–आठ वर्षांच्या दीर्घ परिश्रमानंतर तो चौथी–पांचवीपर्यंत चढला हें कांहीं खोटे नाहीं.

पावटे मास्तरांच्या काळांत मात्र त्याला वर चढणें कठीण झालें. त्या काळांत त्याला पावट्यांच्या हातचा मारच अधिक मिळाला. पाठीची सालडी लोंबवणारा मार खाऊन तो अक्षरशः बेजार झाला होता. त्यामुळें एके दिवशीं निर्धार करून त्यानें शाळेला रामराम ठोकला. पण जाण्यापूर्वी एकदां त्यानें पावट्याला






चांगलाच हात दाखवला. एकदां पावट्यांच्या खुर्चीवर त्यानें गुपचूप खाजकुलीचीं कुसें आणून शिंपडली आणि अवघ्या अर्ध्या तासांत अक्षरशः धोतर सुटेपर्यंत पावटे आपल्या मांड्या खाजवूं लागला. इतका कीं, न राहून तो थेट घरीं पळाला.

मांड्या घोंगडीनें घासून आणि त्यावर आमसुले चोळून पावट्यानें कशीबशी खाज शमविली आणि तो परत शाळेंत आला. संतापानें जळत परत आला तोच त्यानें काठीला हात घातला. आतां साऱ्या पोरांची चामडी हा लोंबणार असें आम्हा सर्वांना वाटलें. हवेंत तरतर छडी कापवीत गर्जना झाली, "खरें सांगा, नाहींतर एकेकाला ठार मारीन. खाजकुलीची कुसें कुणी घातली ?"

"नरूनें, मास्तर !" माराच्या भीतीनें परशा बोलून गेला.

"कुठें आहे तो भोसडीचा ?"

त्याच्या डोळ्यांतले दोन निखारे एकदम फुलले. गरगरा फिरले.

पण नरू वर्गांत दिसला नाहीं. आणि दिसणारहि नव्हता.

पण पावटेहि कांहीं कमी नव्हता. छडी घेऊन तो नरूच्या घरीं गेला. घरीं कुणीहि नव्हतें. नारळ काढण्यासाठीं नरू माडावर चढला होता. हातात छडी घेऊन आलेला पावटा त्यानें पाहिला. पावट्यानें इकडे तिकडे वांकून पाहिलें. कुणी दिसलें नाहीं. नरूला वाटलें माडावरच गप्प रहावें. पण दुसऱ्याच क्षणांत त्यानें विचार बदलला. पावटा करून करणार काय ? शाळा तर सोडलीच आहे. तो एकदम वरून ओरडला, "काय रे पावट्या, उसळ होयी ?"

"भडव्या खालीं उतर ! तुलाच देतो उसळ."

"मुकाट्यान् चलूक लाग. नाय तर नारळ घालीन बोडक्यांत !"

तो खरोखरच नारळ डोक्यांत घालील म्हणून पावटे घाबरला आणि पळत जाऊन नरूच्या पडवींत जाऊन उभा राहिला आणि तिथून ओरडला, "तूं माडावर किती वेळ बसतोस तें मी बघतों."

आव्हान स्वीकारून, नरूहि खाली उतरला. तो खालीं उतरतांच पावट्यानें लांडग्यासारखी त्याच्यावर झडप घातली.

'खाजकुलीचीं कुसें माझ्या धोतरांत कुणी घातली ?'

'माक. नाय माहीत !' नरू डरला नाहीं.

आडदांड पावट्यानें त्याचे दोन्हीं कान पकडले आणि जोरकसपणें उपटले. त्या क्षणींच नरूच्या डोळ्यासमोर सूर्याची पिल्लें चमचमलीं. त्यानें झटकन पावट्याच्या धोतराला हात घातला आणि तो खेचूं लागला. क्षणभर कान तुटतात कीं धोतर सुटतें अशी परिस्थिति आली. नरूनें सारी शक्ति एकवटली आणि धोतर खेचतां खेचतां तें टरटर फाडलें. शेवटीं कनवटीचा विळखा सैल झाल्यासारखा वाटतांच पावट्यानें नरूचे रक्ताळलेले कान सोडले आणि 'बघून घेईन' अशी धमकी देत, शिव्या देत, आपल्या फाटक्या धोतरांतली अब्रु सांभाळीत तो कसाबसा पळत सुटला.

पण त्याची पुढचीं पावलें उलटीं पडलीं. दुर्गाबाय नांवाची एक तरुण विधवा रात्रीं काळोख पडल्यावर पावट्याच्या खोलींत येते असें कानीं येतांच नरू सज्ज झाला. पावट्याच्या घराच्या आसपास रात्रीं तो गुप्त हेरासारखा फिरूं लागला. दुर्गाबाय त्याच्याकडे येते ही खात्री करून घेतली आणि मग तो प्रकार गांवभर सांगत सुटला. दोन दिवसांच्या अवधींतच त्यानें ही बातमी गांवभर केली. त्यामुळें 'तुझें बघून घेईन' अशी उर्मट धमकी देणारा पावटा नरूला लांबून बघतांच पळ काढूं लागला. पण नरू खवीस. 'दुर्गे दुर्गट भारी, तुजविण संसारी' अशी टाळ्या पिटून आरती म्हणत तो पावट्याच्या मागें नाचूं लागला. पुढें पावटे पळायचा आणि पाठीमागून आरती म्हणत नरू धांवायचा. पुढें पावटे सस्पेंड होऊन जाईपर्यंत ही गंमत चालू होती.

कुणाचीहि कसली दीक्षा नसतांना मधून मधून नरूला देशभक्तीचे झटके येत असत. आपल्या हातून कांहीं तरी देशसेवा घडावी असें त्याला मनापासून वाटत असे. एकवीस सालच्या सत्याग्रहाच्यावेळीं तो शाळेंत होता. पण त्यावेळीं जवळ जवळ पंधरवडाभर शाळा सोडून तो प्रभात फेऱ्या काढण्यांत दंग झाला होता. खादीचा लेंगा, सदरा आणि टोपी घालून आणि हातीं तिरंगी झेंडा घेऊन तो इथून तिथून बाजारांत फिरायचा. त्याच्या पाठीमागें दहा पंधरा पोरें असायची. 'चरखा फिरा फिराके । लेंगे स्वराज्य लेंगे ।' असें भसाडें गाणें गात तो सारखा फिरायचा. गाणें गाऊन दम लागला कीं मग 'गांधीजी कीं जय' असें ओरडून आपला घसा कोरडा करून घ्यायचा. अर्थातच, फक्त आठ दहा दिवस ही मोहीम चालली होती. एकदा चावडीवरून पहांटेच जाणाऱ्या या फेरीमुळें हवालदारांची झोंपमोड झाली. आणि मग चार थपडा नरूच्या कानपटांत लगावून त्यानें ही स्थानिक चंडाळी मोडून काढली. त्यावेळच्या एका आठवणीनें मला आजहि गंमत वाटते. त्यावेळीं नरूनें स्वतः लेंगा शिवून घेतला होता आणि प्रभातफेरींत येणाऱ्या आमच्यासारख्या पोरांना तो लेंगे शिवून घ्यायचा आग्रह करायचा. कारण 'लेंगे स्वराज्य लेंगे' या ओळीपुढें लेंगे आणि स्वराज्य यांचा कांहीं तरी घनिष्ट संबंध आहे असें त्याला वाटायचें.

बत्तीस सालीं आमच्या गांवी मिठाचा सत्याग्रह होता. त्यासाठीं बाहेर गांवाहून



पोर्तुगिजांच्या हवशानीं नरूचें थोबाड फोडीत विचारलें "तुझें नांव काय ?"

"नरू"

"ऑं प्रायमिनिस्टर नेरू ?"

"माय नेम नरू" हें एकच इंग्रजी वाक्य नरूला येत होतें.







अनेक सत्याग्रही आले होते. आमच्या गांवांतल्या अनेक लोकांनीं एक गंमत म्हणून सत्याग्रहांत नांवें दाखल केलीं होतीं पण सत्याग्रहाच्या आधीं चार दिवस पोलीस तुकडया येऊन थडकल्या आणि एकामागून एक अशी सर्व नांवें गळून गेलीं. पण नरू गळला नाहीं. तो डगला नाहीं. आपल्या चपळाइनें त्यानें पोलिसांच्या हातांवर तुरी दिली. त्यांच्या कडयांतून तो हां हां म्हणतां निसटला आणि मिठाच्या राशीवर आडवा लोळला. येतांना दोन्हीं मुठी भरून त्यानें मीठ आणलें. त्याबद्दल आठवणींत राहील असा छडीचा मार त्याचा पोलिसांकडून खावा लागला. पण तो वाकला नाहीं मोडला नाहीं. रडलासुद्धां नाहीं. छाती पुढें काढून मोठ्या अभिमानानें तो बाजारांत आला. सत्याग्रहाच्या धसक्याने बाजारांत भयग्रस्त मुद्रेनें वावरणाऱ्या गांवकऱ्यांना त्यानें मुठी उघडून मिठाचें दर्शन दिलें.

पण त्याचें कौतुक कुणी केलें नाहीं. शाबासकी कुणी दिली नाहीं उलट आपल्या नेहमीच्याच स्वभावानुसार सर्वांनीं त्याची टिंगल केली. 'मेलो सत्याग्रह करतलों! तोंड बघा मेल्याचा!' असें म्हणून सारेजण हंसले. तें मीठ सत्याग्रह करून आणलेलें नाहीं, त्यानें तें घरूनच आणलें होतें असें एकमेकांस सांगून सर्वांनीं त्याची संभावना केली.

पुढें देशभक्तीचें चीज होत नाहीं म्हणून किंवा देशभक्तीनें पोट भरत नाहीं म्हणून म्हणा, नरू, नायकाच्या भुसारी दुकानांत नोकर राहिला. धान्याचीं मापटीं मोजावीं, तेलाची मापटी भरावीं, साबणाच्या वडया कराव्या, गुळाची ढेप फोडावी अशीं कामें सुरू झालीं. सकाळी सात वाजल्यापासून दुपारीं बारा वाजेपर्यन्त आणि दुपारीं तीन वाजल्यापासून रात्रीं नऊ वाजेपर्यन्त गिऱ्हाईकांना तोंड देत, नायकाच्या शिव्या खात नरू काम करीत राहायचा. आणि या साऱ्या कामाबद्दल बिचाऱ्याला पांच रुपये पगार मिळायचा. रोज घरीं जातांना हा गल्ल्यांतून चोरून कांहीं नेईल म्हणून नाईक नरूचीं रोज कनवट चांचपून बघायचा. उघडा, बोडका नरू चोरून कांहीं लपवणार कुठें? एक जागा म्हणजे पंचाची कनवट. पण त्या कनवटीवर नायकाची नजर. पण पांच रुपये पगारावर नरूचें भागत नव्हतें. त्यासाठीं त्याला चोरी करणें भागच होतें. पण चोरी सुद्धां करायची कशी? शेवटीं नरूनें कल्पना लढवली. नरू एक दिवस आड एक पैसावाली साबणाची वडी घेऊन जायचा आणि त्या वडींत एखादी दुसरी अधेली खुपसून ठेवायचा. हा सारा प्रकार मोठ्या विश्वासानें तो मला सांगायचा. "साबणाच्या पेटाऱ्यांतून अधेलीची आगऱ्याहून सुटका" असें तो म्हणायचा. किती तरी वर्षें त्याचा हा प्रकार चालला होता. आणि एके दिवशीं दुर्दैव ओढवलें. त्यानें काढून ठेवलेली साबणाची वडी खुद्द नाईकच घेऊन गेला. धोतराला साबण लावतां लावतां एकाएकीं अधेली चमकली आणि त्याच दिवशीं नरूची नोकरी सुटली. नरू बेकार झाला.

त्यानंतर नरूनें स्वतःचा धंदा सुरू केला. गरम भजीं करून तो बाजारांत आणायचा आणि पुड्या बांधून विकायचा. पण रोखीपेक्षां बुडती उधारीच वाढल्यामुळें त्याचा तोहि धंदा बसला.

त्यानंतर अगदीं अलिकडेच घडलेली एक दुर्घटना मला कळली आणि खरोखरच चुटपुट लागली. अलिकडेच जो गोवामुक्तीचा सत्याग्रह झाला त्यांत नरू स्वयंस्फूर्तीनें दाखल झाला. यावेळीं त्यानें लेंगा टाकून नेहरूंसारखी सुरवार शिवून घेतली. सदरा चढवला. जाकिटाचे बटण लावले आणि बटणांत एक गुलाबाचें फूल खोवून नरूनें झेंडा हातीं घेतला आणि तो मोठ्या हिरीरीनें गोव्याच्या हद्दींत घुसला.

पोर्तुगीजांच्या हबशी पोलिसांनीं त्याचें थोबाड फोडीत त्याला अटक केली. चौकीवर त्याचें नांव विचारतांच नरू गंभीर चेहरा करून उत्तरला, "नरू!" "नेरू?" सर्व सोजीर विस्मयचकित झाले. त्यांनीं इकडे तिकडे धांवपळ केली आणि जीप गाडींत बसवून त्याला म्हापशाला नेलें. त्या साऱ्या गडबडींत पोर्तुगीज भाषेंत झालेली बडबड त्याला समजली नाहीं. फक्त म्हापशाच्या चौकीवर त्याचें पुनः एकदां खात्री करून घेण्यासाठीं नांव विचारण्यांत आलें.

"नरू!"

"नेरू? प्रायमिनिस्टर नेरू?"

"माय नेम नरू" एक इंग्रजी वाक्य नरूला माहीत होतें.

"दिल्लीवाला नेरू?"

"माय नेम नरू!"

हेंच संभाषण कांहीं वेळ झालें आणि नरू हा नेहरू नव्हे हें हबशांना कळतांच आपणांस फसवलें असें वाटून ते चिडले. नरूला आडवा पाडून पांच सात सोजीर त्याच्या अंगावर राक्षसासारखे नाचले आणि मग त्याला सरहद्दीवर आणून टाकलें. या प्रकरणांत नरूच्या पायाची नळी फुटली आणि नरू कायमचा लंगडा झाला.

अलिकडेच मला कळलें तें असें कीं, आज 'पंतप्रधान नरू' अशी सर्वांनीं केलेली टिंगल ऐकून घेत नरू कुबड्या लावून बाजारांत फिरतो. भिकारी म्हणून भीक मागत फिरतो एखाद्याच्या नशिबीं फक्त खडतर जीवनच येतें ते असे!

●●●



खरा शास्त्राचा, धर्माचा अर्थ राजधर्माचं
झालें नाही आकलन. लोकनीतिहून
असते वेगळी राजनीति हें कळलें नाही मला.
माझ्या धर्मांत नव्हता विवेक.
होती फक्त उत्कटता.. अपार उत्कटता–
सत्य धर्माविषयीं. सत्याच्या आंधळ्या–
तत्वज्ञानांत बुडून गेले होते माझ्या–
प्रज्ञेचे डोळे, मी हरवून बसलो होतो
स्वतःला, मोहानं विणलेल्या भयानक
कोळिष्टकांत.

# सहदेवा थोडा अग्नि आण....

—पद्माकर गोवईकर

'राजा, उत्पातांचें फळ तेरा वर्षेंपर्यन्त येत असते. राजा धर्मा, सर्व क्षत्रिय कुलाचा विनाश हा उत्पात करील. भरतश्रेष्ठा, तुला एकट्यालाच कारण करून, दुर्योधनाच्या अपराधामुळें उद्‌भवलेला हा उत्पात भीमार्जुनांच्या पराक्रमानें विनाश करून हा काल क्षय पावेल. राजेंद्रा! कैलासशिखरतुल्य वृषभावर आरूढ झालेल्या, यमाचें आश्रयस्थान असलेल्या आणि दक्षिण दिशेचें सतत निरीक्षण करणारा शिव तूं पहाटेच्यावेळीं स्वप्नामध्यें पहाशील, परंतु त्या संबंधानें तूं विचार करूं नकोस. कारण काळाचें उल्लंघन कोणालाच करतां येत नाहीं... तुझें कल्याण असो......!'

पुरुष प्रयत्नांनीं दैवाला अडविणें कसें शक्य होईल? मनुष्यश्रेष्ठ व्यास महर्षींनी जें सांगितलें तें अवश्य होणारच. तसेंच झालेंहि. सर्व क्षत्रिय समूहाच्या नाशाला कारण मी व्हावें, हा कालाचा इष्ट हेतु मी झालों युद्ध दूर होईल अशी काळजी घेतघेतच मी युद्धाला आव्हान दिलं शत्रूसही मी मांडीवर घेतले. स्वामीचा घात करणाऱ्या मार्जाराचें मी पोषण करीत आलों. अत्यंत ज्वालाग्राही कापूर पेटवून मी स्वस्थ राहिलों. उवंगीत भस्मदेखील गमावून बसलों. 'धर्मानें वागा, धर्मानें वागा' असें सांगणाऱ्या समुद्रतीरावरच्या हंसासारखी माझी गति झाली. आप्तजनाच्या विश्वासाचीं अडीं मी खाऊन टाकलीं. मी पापी आहे...

आज माझ्या आयुष्याचा मागोवा घ्यायला फुरसद मिळाली आहे मला. छायाप्रकाश बहुलाच्या खेळानें माझं आयुष्य रंगलं होतं. युद्धाच्या सावल्या आल्या, कीं तें छाया बहुलाचा आश्रय करी. शास्त्रधर्माचा प्रसंग आला, कीं तें प्रकाशात येई. मुळांतच मला भांडण तंट्याचें वावडे. अजातशत्रुत्व माझ्या शरीरांत भिनलेलें पण सारा जन्म शत्रुत्वाशी झगडण्यांत गेला. चिंतनात तन्मय झालों मी. सतत आदर्शाला पूजित आलों. आणि म्हणूनच मी माझें हळवेपण मोडूं शकलों नाहीं. या माझ्या गुणांचा परिपाक इतक्या दोषांनीं भरला गेला, कीं इतर चारी भावांपेक्षां मी दोषी ठरलों. निदान तसा भासलों. भूलींग पक्ष्याप्रमाणें माझी अवस्था झाली. 'युद्ध करूं नका. युद्ध करूं नका' असें कळवळून सांगत असतां मीच युद्धाचें कारण झालों, बायकोचं पातिव्रत्य पणाला लावण्याइतका नादान, जुगारी, अवमानाचा सूड घेण्याचें सोडून भोंगळ तत्वज्ञान उराशी कवटाळणारा मूढ क्षत्रिय, कोमट प्रकृतीचा, पौरुषत्वाच्या अभिमानाची

राख झालेला षंढ पति—याहून कुठले न्यून इतर मनुष्यांच्या कपाळीं आलं असेल !...

आयुष्यभर मी स्वतःचा कोंडमारा केला. खूप खूप वेदना आंत सांठवली. असत्याच्या प्रमत्त लाटांवरून सत्याचीं, शांतीचीं नम्र पावलं टाकीत मी संथगतीनें सीमापार आलों आहे. हें सारंच अनाठायीं नव्हतं. मला स्वतःलाहि अज्ञात असलेल्या एका अलौकिक जगाची विलक्षण ओढ माझ्या गात्रागात्रांत भरलेली होती. डोळ्यांना जें दिसत नव्हतं, नजरेला जें भावत नव्हतं आणि बुद्धीला जें आकलन होत नव्हतं; असं तें दूरवरचें विश्व मला आंतून चाळवीत होतं. संभ्रमित करीत होतं. कल्पनेच्या त्या विश्वांत वास्तवतेच्या विश्वांतील व्यवहार आटोपण्याचा मी खुळा अट्टाहास केला. माझ्यापुरतें मला ते प्राप्त झाले. पण त्याचवेळीं मी एक अनामिक आणि फार मोठें श्रेय हरपून बसलों......

मी अमर झालों ! मी अमर झालों आणि तेंच आयुष्य पुनः माझ्या मागं लागलं. मला पूर्वजन्माचा विसर पडला नाहीं. मरणानं माझं पूर्वाश्रमींचं आयुष्य हिरावून नेलं नाही. त्याच अघटित घटनांची पुनः पुन्हा: उजळणी करण्याकरितां मी अमरपदांनी शापीत झालों. माझ्या दुबळेपणांतील कुरूपतेला मृत्यूहि शिवला नाहीं. रक्तबंबाळ पायांनी जिवंतपणीं मृत्यूला विळखा घालणारं मरण हवं होतं मला. मृत्यूला धन्य करणारा मृत्यू हवा होता मला. मला भीष्माचा दुःखद शेवट हवा होता, मला कर्णाचं हिमालयी मरण हवं होतं. मी शूद्र आहे. मी फार मोठा शूद्र आहे. मी मरणापासून दूर पळालों. क्षमेचा विषय झालेल्या मला दुसऱ्याहि कुणी मारलें नाहीं....

माझ्यासारख्या दुबळ्या व्यक्तीला नियतीनें युद्धाचं बीज कां केलं समजत नाहीं. सूक्ष्म धर्मानं चालणारा मी अक्षविद्येंत फसविला गेलों. संपूर्ण जागृत अवस्थेत असतांना मी फसलों—मयसभेंत राजा दुर्योधन आभासाच्या अद्भूत सृष्टीवरून पाय घसरून पडला. तीच अवस्था माझी झाली. या दुबळ्या देहाला फार मोठा अहंकार झाला. या अहंकारापोटी मी माझ्या आप्तजनांना पणाला लावलं. सारं आयुष्य झुगारून देण्याचा यत्न केला; आणि आयुष्याचा हा असा जुगार झाला. अखेर, मला कांहीं प्राप्त झालं कां ? धर्माधर्माची कुटलेली माती हातांत घेऊन, गरम रसाच्या प्रवाहांतून आणि अश्रूंच्या ओघांतून मी या स्वर्गद्वारीं आलों,—एका श्वानाच्या दृष्टींतील कारुण्य बरोबर घेऊन. कारुण्याचा एक चतकोर तुकडा अखेर हातीं लागला. युधिष्ठिर करुणेला प्राप्त झाला. सत्यपथावरून चालत गेलेला एक दुबळा जीव......

मी धर्मासाठीं अर्थाचा नाश केला. तात्कालिक सुखाच्या नादी लागून काम् पूर्ण करण्याकरितां धर्म आणि अर्थ यांचा मी नाश केला. मित्र, उदासिन किंवा शत्रु यांच्या मनांतील हेतु मला समजेल—पण माझ्या स्वामीनीचं दुःख मला उमगलं नाहीं. मी तिच्या पातिव्रत्याचा धंदा करूं दिला.

भूतकाळाच्या विरत्या पावलांचें पडसाद अजून ऐकूं येताहेत......

वादळांत सापडलेल्या वृक्षासारखा हातपाय आपटीत राजा शकुनि ओरडत होता, " जिंकले, जिंकले..."

फांसे उलट पडत होते आणि मी हरत होतो. एकदां फांसा उलटा पडला, कीं वनवास ठेवलेलाच असतो हें ज्ञात असून मी पुनः पुन्हां माझं वैभव पणाला लावत होतो. पुनः पुन्हां फांसे उलटे पडत होते आणि पुनःपुन्हां मी अपेशी ठरत होतो. राजा सौबल किंचाळतच होता, "जिंकिलें, जिंकिलें जितमित्येव..."

चित्ररथानें संतुष्ट होऊन प्रीतिपूर्वक अर्जुनाला दिलेले तित्तिर पक्ष्यांप्रमाणें कबऱ्या रंगाचे घोडे, मेघांहून शुभ्र, वाऱ्याहून गतिमान् अशा घोड्यांचा रथ, पर्णाशा नदीकांठचें अपूर्व वैभव, माझा सांवळ्या वर्णाचा नकूल, पंडित अशी पदवी प्राप्त झालेला—सहदेव...!

फळून येण्यापूर्वीं मी मला स्वतःलाहि हरवून बसलों !

आणि मग द्युतनिष्णात शकुनि ओरडला; "राजा, तूं द्युतामध्यें हरविली नाहींस अशी एक तुझी प्रिया उरली आहे. ती पांचाली कृष्णा पणास लाव आणि तिच्या साह्यानें पुन्हां आपल्यास जिंकून घे........"

आयुष्यांतील अत्यंत असामान्य विजयाचा, अत्यंत सिद्धीचा, मोहाचं दमन करणाऱ्या अपूर्व यशाचा तो काळ, ती घडी येऊन ठेपली होती. मध काढणाऱ्याला मधाचें पोळें सांपडलें म्हणजे त्याला खालचा कडा समजेनासा होतो. पाणी सखल भागाकडे वाहते हें समजणारा मी तसाच वाहवत गेलों. मूर्खांच्या नादीं लागून प्रज्वलित झालेल्या भयंकर अग्निमधें मी शिरलों आणि जी ठेंगणी नाहीं व उंचहि नाहीं—कृश नाहीं आणि स्थूलहि नाहीं, जिचे केंस काळे व कुरळे होते, वेदीप्रमाणें जिचा मध्यभाग होता, शरदृतूंतील कमलपत्रनयना अशा सुंदर कृशोदरी पांचाली द्रौपदीला मी पणाला लावली. आत्मघातकी युधिष्ठिरानें वेळूप्रमाणें फळ धारण केलें...

कृष्णेच्या नांवानें मी पुन्हां एकदां फांसे टाकले आणि जिवाचा आकान्त करून शकुनि पुन्हां किंचाळला; ' जिंकलें, जिंकलें...'

मी दूतामार्फत माझें निश्चित झालेलं मत माझ्या सखीला कळविलें. मी तिला आज्ञा केली,

" पांचाली द्रौपदी, तूं रजस्वला, एकवस्त्रा निरीची गांठ सुटलेली कशीहि असलीस तरी तशीच सभेमधें आपल्या सासऱ्यासमोर येऊन उभी राहा......"

आणि मग लाल डोळे असलेला तो राजपुत्र दुःशासन उठला आणि वेड्यासारखा ओरडत धांवला,—

" कृष्णे ! पांचाली, ये ये; तूं जिंकली गेली आहेस. लाज सोडून तूं दुर्योधनाची भेट घे. कमलपत्रनयने, कुरुंची तूं सेवा कर ! तुला आम्हीं धर्मानेंच आणि धर्माकडूनच मिळविली आहे. तूं सभेमध्यें दासीप्रमाणें चल......."

उदास झालेल्या द्रौपदीनें आपले फिकें पडलेलें तोंड पुसत दुःखानें राजस्त्रियांच्या मंदिराकडे धांव मारली. रागानें गर्जना करीत दुःशासन मोठ्या वेगानें तिच्यामागें धांवला आणि त्यानें त्या राजपत्नीचे लाटांप्रमाणें हालणारे, काळे व लांब केस धरले. जे केंस राजसूय यज्ञाच्या शेवटीं अवभृत स्नानाच्या वेळीं मंत्रांनी पवित्र झालेल्या उदकानें ओले झाले होते ते कृष्णेचे काळेभोर केंस धृतराष्ट्राच्या पुत्रानें बलात्कारानें धरले. लांब लांब केस असलेल्या माझ्या कृष्णेला वायु केळीला खेचतो तसा दुःशासन खेचत होता. केस विखरलेले, उत्तरीय खाली पडलेले, दुःशासन हिसके देत आहे अशी अंगयष्टि वाकलेली द्रौपदी क्रोधानें म्हणत होती,

" मी रजस्वला आहे; मूर्खा, माझ्या अंगावर वस्त्रहि एकच आहे; अनार्या, अशा स्थितींत मला सभेमध्यें नेऊं नकोस..."

आणि मग असह्य होऊन माझा भीम ओरडला. तापलेल्या सळइसारखी आज






माझ्या कानांत जी गर्जना शिरते आहे. मी फासे टाकीत होतो आणि हातपाय आपटीत भीम किंचाळत होता—;

"सहदेवा, थोडा अग्नि आण! सहदेवा, थोडा अग्नि आण" म्हणजे, रक्ताळलेल्या विचारानें उद्युक्त झालेले हे दोन्हीं हातच मी जाळून टाकतो. इंद्रियनिग्रहशून्य कौरवांकडून आज पांचाळी या धमनिष्ठ षंढामुळे अनन्वित पीडा पावली आहे. द्यूतकारांच्या आश्रयाला पण्यांगनासुद्धां असतात, पण त्यांच्यावर सुद्धां द्यूतकारांची माया असते. त्यांना देखील पणाला लावून कोणी फासे टाकत नाहीं.........

परंतु अक्षांच्या सर्वस्वी आहारी गेलेल्या या धर्मलंड युधिष्ठिरानें स्वतःची धर्मपत्नी देखील पणास लावून टाकली आहे..........

सोन्याचा प्राणी उत्पन्न होणें असंभवनीय असतांहि रामाला सोन्याच्या मृगाविषयीं लोभ उत्पन्न झाला, तसा ज्यांच्या नाशाची वेळ जवळ आलेली असते. त्यांच्या बुद्धीचा विपर्यास होतो. या मूढ धर्माला आज बुद्धिमांद्य आलें आहे. या मंदबुद्धीनें आज अनर्थ केला आहे. आमचा नेता म्हणून ज्ञात असलेल्या या शांतिदूतानें आज धर्माचा अतिक्रम केला आहे. धर्माची गुंगी देऊन यानें आम्हांला प्रतिकार—अक्षम बनविलें आहे. एकबंधुत्वाच्या तिरडीवर यानें आम्हांस करकचून बांधलें आहे. जीवन्मृत केलें आहे. सहदेवा, त्वरित थोडा अग्नि आण म्हणजे हे द्युतमग्न हात मी दग्ध करून टाकतो.

अठरा अक्षौणी शेंदाडशिपायांनीं तिच्या सुंदर शरीराचा उपभोग घेतला असता तरी मला इतकी खंत वाटली नसती. अरेरे! ह्या दासपुत्र कर्णानें देखील मी जिवन्त असतांना कृष्णेला 'वेश्या' संबोधन द्यावे ना! आमच्या सर्वनाशाला कारणीभूत झालेल्या या वयोवृद्ध क्लिबाचे दोन्ही हात मला जाळूं दे. "जा, जा, सहदेवा, सत्वर थोडा अग्नि आण म्हणजे आम्हांला निरंतरचे दास्य आणणाऱ्या या अल्पबुद्धि धर्माचें दोन्ही हात मी दहन करून टाकतो......."

जळणाऱ्या वृक्षाच्या ढोलींतून निघणाऱ्या ठिणग्यांप्रमाणें क्रुद्ध झालेल्या भीमाच्या शरीरांतून अग्नीच्या ठिणग्या बाहेर उडत होत्या. तामसी, कोपिष्ट म्हणून त्यावेळीहि मी त्याच्या बोलण्याचा अव्हेर केला.

पण आज!
माझ्या मनाला झाली आहे आज
आभाळा एवढी जखम. जन्मापासून—
चाटीत आलो मी, अंगप्रत्यंगाच्या जीभा
करून, सत्याला, धर्माला आणि शांतीला.
सडते आहे माझी जखम पांचालांच्या
अपौरुषत्वानें. कर्णाचं रथचक्र करताहे
आक्रंदन, रजस्वला द्रौपदी बसली
आहे कुंकू लावून दुःशासनाच्या
नांवानें, पांडवांचा जुगारी जथा चालला
आहे सुईच्या अग्रावरील मृत्तिकेखाली—
आणि—
किंचाळत बसला आहे पटावरच्या
पांढऱ्या कवड्या कुरवाळीत शकुनि—
माझ्या या जखमेच्या चिखलांत!
संपली.युधिष्ठिराच्याधर्माची कथा इथं संपली.
युधिष्ठिराच्या धर्माची माती वितळून गेली
आहे आज!
मी होतों केवळ बहुश्रुत.
नव्हती मला प्रज्ञा स्वतःची असें
आज मला वाटतें. पळीला जशी सांबाऱ्याची-
गोडी समजत नाही, तसा कळला नाही
मला
खरा शास्त्राचा, धर्माचा अर्थ राजधर्माचें
झालें नाही आकलन. लोकनीतिहून
असते वेगळी राजनीति हें कळलें नाही मला.
माझ्या धर्मांत नव्हता विवेक.
होती फक्त उत्कटता. अपार उत्कटता—
सत्य धर्माविषयीं. सत्याच्या आंधळ्या—
तत्वज्ञानांत बुडून गेले होते माझ्या—
प्रज्ञेचे डोळे, मी हरवून बसलो होतो
स्वतःला, मोहानं विणलेल्या भयानक
कोळिष्टकांत.
आयुष्यभर पोखरत राहिलो मी धर्माचा
डोंगर .आणि आज सांपडलें आहे मला,
आयुष्याचा जुगार झाल्यावर,
धर्मसरितेचं जन्मनक्षत्र.
उन्नतीचा प्रयत्न
हीच उत्कृष्ट राजनीति.
असंतोष हेंच
वैभवाचें मूळ होय!
मी होतों नीतिमान दुबळा कीं,
सामर्थ्यवान अपवित्र?
धरित्रीवर शोक करतांना अजून—
दिसते आहे मला, माझी कौरवांची
खाद्य झालेली सखी—द्रौपदी.
अजून दिसतो आहे मला माझा
रागानें हातपाय आपटत किंचाळणारा भीम!
पश्चात्तापाचा कढच चीक
निथळत आहे माझ्या शरमिंद्या
डोळ्यांतून आज!
क्षत्रीय कुलाच्या नाशाचं कारण
मी आहे.
भीमा, अर्जुना!
क्षमा करा मला.
कृष्णे—द्रौपदी!
क्षमा कर मला .........
सहदेवा, सहदेवा, सत्वर थोडा
अग्नि घेऊन ये, असशील तेथून, आणि—
जाळून टाक माझे हे अधर्मी
हात, अक्षाच्या एका फेकीबरोबर
कृष्णेला शत्रूची दासी करून—
टाकणारे! आणि देऊन टाक
मला—
माझ्या पापाचे प्रायश्चित! ●●●




*मनाच्या तिजोरींत सुख मावेनासं झालं,*
*सौख्य उतूं जाऊं लागलं, जर त्याचं*
*वांटप केलं–दान केलं तर—?*



**म**न कसं अगदी हलकं हलकं आणि प्रसन्न वाटत होतं. कसला कसला मनावर ताण नव्हता. कसली कसली निकड नव्हती. केलंच पाहिजे असं कांहीं नव्हतं. श्रीकान्त परगांवीं गेले होते. दोन तीन दिवस येणं जमणार नाहीं म्हणाले होते. कालच त्यांचं गोड गोड पत्र आलं होतं. उद्यां आणखी नक्की येणार होतं. हो! परगांवीं गेल्यावर दिवसाआड कांहीं झालं तरी पत्र पाठवायलाच हवं असा त्यांच्याशी मी करारच करून घेतलेला आहे मुळी!

माझी शाळेची नोकरी काय गाजराची पुंगी. वाजली तर वाजली नाहींतर मोडून खाल्ली अशी आहे. खरंच मला हसायला येतं. ज्यांना तशी जरुरी नसते अशा माझ्यासारखीला नोकऱ्या मुंगळ्या-सारख्या चिकटून बसतात. बेफिकीर व बेपर्वा वागलं तरी कोणी ब्र काढीत नाहींत. उलट म्हणतात, "अहो! त्यांच्या वाटेला जाऊं नका. नोकरीची त्यांना जरुरी नाहीं. फट् नोकरीचा राजीनामा देतील बरं!" आणि ज्यांना नोकरीची खरोखर गरज असते त्यांच्यामागे कामाचा नि विवंचनेचा कोण ससेमिरा लागून राहतो. मी गरजू नाहीं त्यामुळें कामाचा लकडाहि माझ्यापासून दोन हात दूरच रहात असतो. आतां आजचीच गोष्ट घ्याना. शाळेचे कसलेसे कार्यक्रम बसवून घ्यायचे आहेत. मी चक्क सांगितलं आपल्याला नाहीं बुवा जमायचं. हो! सुटीच्या दिवशीं निष्कारण खपायचं कशासाठीं? पण बिचाऱ्या उषा देशपांडेला कांहीं असं बोलायचं धाडस झालं नाहीं. नुक्तच लग्न झालंय तिचं. नवऱ्याला मास्तरकीचाच पगार. त्यामुळं नोकरी न करून चालण्यासारखं नाहीं. आज सुटीचा वेळ आपल्या नवऱ्याच्या संगतीत घालायचा सोडून तिला शाळेंत घालवावा लागणार आहे. तोंडावर रडकी कळा असेल तिच्या. काय अभिनय जिव्हाळ्यानं शिकविणार ती मुलींना!




अनुक्रमणिका

वेळ उन्हं अरण्याची आहे. रणरण ऊन थोडं कमी होतं आहे. माझ्या या टुमदार दोन खोल्यांत मात्र उन्हामुळं वाढणाऱ्या उष्म्याचा मागमूस नाहीं. टेबलावरचा पंखा गरगरतो आहे. फरशी गार आहे. खोलीतलं वातावरण समृद्ध आणि प्रसन्न आहे...मीच नाहीं का तें निर्माण केलेलं! माझी डुलकी घेऊन झालेली आहे. मऊ आराम खुर्चीवर मी आसळटल्यासारखी रेळले आहे. बारीक काळ्या ठिपक्यांचं पांढरं नेसू माझ्या खांद्यावरून घसरून आराम खुर्चीच्या एका हातावर स्थिरावलं आहे. माझ्या अंगांतली पांढरी स्वच्छ बॉडी माझ्या गोऱ्या कांतिवर जणूं विसावली आहे. समोरच्या आरशांत माझं नितळ स्वरूप प्रतिबिंबित झालेलं असून माझे काळेभोर डोळे ते मला दाखवीत आहेत.

टक लावून मी आरशांतल्या माझ्या प्रतिबिंबाकडे पहात आहे. श्रीकान्त जसे टक लावून पाहतात तसे. ते नेहमी म्हणतात—

"मालू! देवानं तुला सौंदर्य देतांना कसलीच कसूर केलेली दिसत नाही. भांडार कसं अगदीं कुबेरासारखं भरगच्च आहे."

खरं म्हणजे मी तशी मोठी सौंदर्यशालिनी नाहीं. सौंदर्याच्या कसोट्या मला कुणी लावल्या तर मला वाटतं मला कमीच गुण पडतील. माझा वर्ण चांगला गोरा आहे. नाक, डोळे चारचौघीं-सारखेच आहेत. पण गोरेपणानं त्यांना नसलेलं सौंदर्य प्रदान केलेलं आहे. अंगानं तशी मी थोडी भारदस्तच आहे. आणि भारदस्तपणा-मुळं आकर्षकता वाढते. निदान पुरुषी दृष्टीनं तरी. शिवाय एक नूर आदमी तर दस नूर कपडा हें सनातन सत्य माझ्या मदतीला असतेंच. कपड्यांकडे मी खूप लक्ष पुरवीत असते. अगदी घरकामाचे कपडे, फाटके असले तरी त्यांची स्वच्छता व योजना यांच्याकडे मी दुर्लक्ष करीत नाहीं. कसं बसलं, कसं बोटलं किंवा कसं मुसमुसलं असता कुरुपता व्यक्त होणार नाहीं याचा मी मनाशी अभ्यास करून ठेवलेला आहे. फार काय, आरामानं सहज पहुडले असतानाहि माझं पहुडणं थोडं कलापूर्णच असतं. आणि म्हणूनच पहाणाराला मी फार सुंदर दिसते. श्रीकान्तला मी त्यांचीच असल्यानं सुंदरतम दिसते यांत नवल नाहीं. पण बाहेरहि माझ्या देखणेपणाचा बराच बोलाबाला असतो. मी एकटक पाहिलं, थोडं हसून बोलले कीं आमच्या शाळेंतले सगळे शिक्षक माझं हवं तें काम करायला तयार असतात. आणि माझी उठबस स्त्री शिक्षिकांपेक्षा पुरुष शिक्षकांमध्येच अधिक असते. म्हणजे मी माझ्या देखणेपणाचा फायदा घेते असं मात्र नाहीं. पण जिथं आपल्याकडे रोखल्या नजरेनं आणि असूयेनं पाहिलं जातं—कांहीं कारण नसता, कांहीं अपराध नसता पाहिलं जातं अशा आपल्या समवयस्क स्त्री सहकाऱ्यांमध्यें वावरून मनस्ताप वाढवून घेण्यांत अर्थ तरी कोणता?

आरशांतली माझी छबी माझ्याकडे पाहून गालांतल्या गालांत मंदस्मित करीत आहे. माझ्या मनांतले विचार या माझ्या छबीलाहि समजत असावेत. माझ्या आनंदात म्हणूनच तीहि सहभागी होत आहे आणि गंमतीनं मुरका मारून माझ्याकडे पहात आहे. इश्श! माणूस एकटं असलं कीं कांहींबाहीच वागतं.

मी खूप खूप आनंदांत, सुखांत आणि समाधानांत आहे. भरगच्च माप भरून ओघळू लागावं तसं माझं सुख माझ्या जीवनाचं माप भरून ओघळतं आहे. बाहेरचं असमाधानी, दुःखी जग पाहिलं कीं बरीक मनाची थोडी चलबिचल होते...पण माझ्या मनांत मी एक ठाम सिद्धांत बांधला आहे. आपलं सुख निर्माण करणं हें आपल्याच हातीं असतं आणि आपली दुःखंहि आपणच निर्माण करून घेत असतो. निदान थोडी लवचिकता स्वीकारली तर दुःखं पुष्कळ कमी होण्याला वाव असतो....दुःख दुसऱ्याला सांगून हलकं होतं म्हणतात मग सुखहि दुसऱ्याला देऊन कां वाटूं नये?

अवश्य वाढायला हवं. मात्र अशाप्रकारें सुख वाटतांना घेणारी व्यक्ति सत्पात्र असायला हवी. नाहींतर व्हायचं कांहींतरीच. सीता-माईनं आनंदाच्या भरांत हनुमानाला पृथ्वीमोलाची माळ अर्पण केली आणि त्या माकडानं त्या माळेतले एक एक रत्न दातांनीं चावून फोडून टाकले. 'अरसिकस्य कवित्व निवेदनम्'च नाही तर काय!... कबिरानं म्हटलं आहे 'पानी बाढो नावमे घरमे बाढो दाम। दोनो हात उचिलिये यही सयानो काम.' घरांत खूप संपत्ति सांठली कीं तिचं दोन्ही दोन्हीं हातांची ओंजळ करून वाटप करायला कबीर सांगत आहेत. मग मनाच्या तिजोरींत सुख भावेनासं झालं, सौख्य उतू जाऊ लागलं तर त्याचंहि वाटप केलं, त्याचंहि दान केलं तर का चालू नये!

माझ्या मनांत हे विचार कां येतात हेच मला समजत नाहीं. आणि मला नेमकं काय म्हणयचं आहे हेहि नीटसं उमगत नाहीं. इत-कंच वाटतं, आमच्या पुष्कळ, पुष्कळ कल्पना या अजूनहि संकुचित आहेत. आम्ही दानाची महती गाऊ, एखाद्यानं आपल्या संपत्तीचं, आपल्या जमिनीचं, आपल्या श्रमाचं दान इतर गरजूंसाठीं केलं कीं आम्ही त्या दानाचं कोडकौतुक करू...पण एखाद्या सुंदरीनं एखाद्या लायक गरजूला आपल्या शरीराचं, मनाचं, त्याच्या समाधानासाठी दान केलं तर......

आई ग! चारचौघांत उघडपणें असं कांहीं मी बोललें तर म्हणतील चळ भरायला या बाईला. कांहीं गोष्टी या उघड बोलायच्या नसतात.

—टक् टक् टक्.

कोण आलंय कुणास ठाऊक! श्रीकान्त तर नसेल? भारीच बाई ओढ घराची. एक दिवसाची कामांत सवड मिळाली असेल. स्वारी धावली लगेच घराकडे. पुन्हा संध्याकाळच्या गाडीनं जायची घाई आहेच. थांबा. खरडपट्टीच काढते चांगली.

पण नको. अपेक्षेनं, आपुलकीनं, ओढीनं माणूस घरीं आल्यावर त्याच्याशी असं वागणं शोभणार नाही आणि जमणारहि नाही मला. माझी त्यांना ओढ आहे हा का त्यांचा दोष?...खरडपट्टी काढण्या-पेक्षा त्यांना चांगलंस बक्षीस द्यायला हवं या बाहूंची अशी माळ घालून...तूं नाहीं रे मेल्या माझ्या प्रतिबिंबा.

टक् टक् टक्.

'कोण?'

टक् टक् टक्.

दार उघडून पाहते तर दारांत कमलाकर!

मी जराशी दचकलेच. कमलाकर आणि असे अचानक आपल्याकडे येतील ही कल्पना मला स्वप्नांतहि आली नसती.

वि. अ. तेंब्रे



अनुक्रमणिका





कित्येकदां तरी घरीं येऊन जा असं निमंत्रण मी त्यांना दिलं होतं. 'येईन की. घरीं केव्हां असता ? रविवारी...? रविवारीच येईन.' असं उत्तर प्रत्येक वेळीं त्यांनी दिलं होतं. पण यायचं मात्र जाणून-बुजून विसरत होते.

अर्थात कमलाकरांनी आपल्याकडे यावें अशी गाढ उत्सुकता मला होती असं मात्र नाहीं. त्यांची माझी ओळखच थोडी अपघाती आणि कारणपरत्वें झाली होती. का कोण जाणें त्यांचा एकंदर संसार आणि जीवन पाहून माझ्या मनांत त्यांच्याबद्दल एकप्रकारची करुणा, एकप्रकारची अनुकंपा निर्माण झाली होती. त्या करुणेंतूनच ओळख वाढली होती आणि म्हणूनच आपल्या घरीं येण्याचे—तो मी मान समजते—निमंत्रण मी त्यांना दिलं होतं. एरवी अनेकांशी माझ्या ओळखी होतात. पाल्हाळीकपणें माझ्याशी ही मंडळी बोलत थांबतात. 'एकदा तुमच्याकडे आलं पाहिजे' अशी आगंतुकी करतात. पण अशा आगंतुकांना मी कधींच उत्तेजन दिलं नव्हतं—देत नाहीं. हो! माझं जीवन माझ्यासाठीं नि माझ्या श्रीकान्तसाठी आहे. वाटेल त्या आगंतुकाच्या बरोबर वेळ घालवण्यासाठीं नि त्यांची चहा—सरबत अशी सरबराई करण्यासाठीं नाहीं.

कमलाकरांची गोष्ट मात्र वेगळी होती.

त्यांची माझी ओळख प्रथम झाली ती त्यांच्या मुलीमुळें. मी त्या मुलीची वर्गशिक्षिका होते. कमल कमलाकर या तिच्या नांवामुळं अनुप्रास साधला होता व त्यामुळेंच तिच्याकडे माझं लक्ष माझ्या काव्यमय स्वभावामुळं वेधलं गेलं होतं. कमल हुषारहि होती. नीट-नेटकी व नाकींडोळीं नीटस होती. मला वाटे आईवर असावी ही मुलगी. तिच्या आईला सहज बघावं अशी सुप्त इच्छा माझ्या मनांत बळावू लागली होती.

एक दिवस अचानक कमलनं मला रस्त्यांत हटकलं.

'मॅडम' ती म्हणाली, 'घरीं चला ना.'

'नको' मी म्हणाले, 'दूर असेल घर. नंतर येईन केव्हांतरी.'

'हें काय समोरच आहे घर.'

कमलनं आग्रह धरला, 'चला ना उभ्या उभ्या.'

म्हणजे मी तिच्या घरावरून जात होतें. मला नाहीं म्हणवलं नाहीं. तिच्या मागोमाग मी घरांत शिरले.

बिऱ्हाडाची जागा चांगली ऐसपैस आणि माडीवरची होती. कमलनं मला माजघराकडे चालवलं. मध्येच माझ्या कानावर रागाचा चढा स्वर आदळला.

'सुटीचा दिवस तूं कधी सुखासमाधानानं घालवूं देशील तर शपथ.' तो पुरुषाचा स्वर होता. गंभीर, निराश पण तितकाच तीव्र.

'माझं तुम्हांला कांहींच पसंत पडत नसतं. तुम्हाला कीं नाहीं मी नकोशीच आहे. होते लौकरच तुमच्या मार्गातून दूर...कांहीं काळजी करू नका.' ही रडवेली कुरकुर स्त्री कंठातून बाहेर पडतांना दिसत होती.

मी ओशाळी झाले. वाटलं असंच परत फिरावं, पण तेहि शक्य नव्हतं. कमल पुढं झाली होती आणि माझं आगमन तिनं जाहीर केलं होतं.

'पप्पा, बाई आल्यायत आमच्या आपल्याकडे.'

आणि मग एकदम ट्रान्सफर सीन व्हावं असं वातावरण बदललं. कमलच्या आईने डोळे पुसले. कांहींतरी कामांत गुंतल्याचा बहाणा तिनं केला. कमलचे वडील कमलाकर पुढं आले व माझं त्यांनीं स्वागत केलं.

'या' ते म्हणाले. 'आमची कमळ आपल्याबद्दल नेहमी कौतुकानं बोलत असते.'

एक पाट त्यांनी पुढं सरकावला. त्यावर धूळ होती. कमलनं चटकन ती फडक्यानं पुसली.

घरांत सर्वत्र पसारा आणि अव्यवस्था यांचं साम्राज्य होतं. मी संकोचून तशीच थांबले.

'बसा ना.' कांहींतरी बोलायला हवं म्हणून कमलची आई म्हणाली.

'जाते, सहज आले कमल म्हणाली म्हणून. येईन अशीच केव्हांतरी' मी म्हणाले.

'थांबा हो,' कमलाकर मध्येच म्हणाले. 'फक्त पांचच मिनिटं. चहा घेतल्याशिवाय जायचं नाहीं.'

ते स्टोव्हकडे वळले. तशी त्यांची पत्नी अगोदर तिथं पोचली आणि स्टोव्ह पेटवू लागली. माझा नाइलाज झाला. अंग चोरून मी कशीतरी पाटावर टेकले.

मनमोकळं बोलावं असं वातावरणच नव्हतं. कमलाकरांच्या बिऱ्हाडाचं निरीक्षण करीत कमलच्या हुशारीबद्दलच आम्ही कांहींतरी बोललो. मला ते नीटसं उमजतहि नव्हतं.

कमलच्या आईबद्दलच्या व तिच्या घराबद्दलच्या मी ज्या कल्पना बांधल्या होत्या त्या साफ कोलमडल्या होत्या. कमलच्या प्रगतीपुस्तकावरून तिचे वडील चांगले पगारदार असल्याचे मला माहीत होते. तेव्हां कमलचे आईवडील कांहींतरी वेगळ्या वातावरणांत-सामान्यांपेक्षा वेगळ्या वातावरणांत असायला हवेत, असे मला वाटले होते.

पण वस्तुस्थिति अगदी वेगळी होती. पैसा असूनहि घरांत व्यवस्था आणि नीटनेटकेपणा नव्हता. पतीपत्नींत संवादित्व नव्हतें आणि त्यामुळेंच घराला एकप्रकारचा भयानकपणा जाणवत होता.

मी कमलच्या आईकडे पाहिलं. ती देखणी होती. पण तिची मुद्रा कुढी होती. शरीर दुर्लक्षित आणि आबाळलेलं होतं. अंगावर उंची वस्त्रें असूनहि त्यांना निर्मळतेचं तेज नव्हतं. माझं नीटनेटकं रूप आणि कपडे याकडे एकसारखी ती पहातांना दिसत होती. आठ्यांचं जाळं तिच्या कपाळावर विणलं गेलं होतं. साधा चहा करतांना तिची कोण धांदल उडत होती.

कमलाकरांकडे मी पाहिलं. त्यांची मुद्रा हताश आणि अपराध्या-सारखी वाटत होती. आपलं, आपल्या संसाराचं आणि विसंवादाचं हें प्रदर्शन त्यांच्या मनांत डाचत असावं. त्यांचें निस्तेज व रागीट डोळे एकेकाळीं मोठे हंसरे आणि तेजस्वी असले पाहिजेत असं पहाणाराला वाटलं असतं. हा माणूस कलावंत आहे, वेगळ्या राहणीला व जीवनाला आसुसला आहे पण त्या राहणीची व जीवनाची त्यानें आशा सोडून दिली आहे याबद्दल माझी खात्री पटली व त्याचवेळीं त्यांच्याविषयीं माझ्या मनांत करुणा उत्पन्न झाली. त्यांच्याबद्दल मला अनुकंपा वाटू लागली.






कसाबसा चहा घेऊन मी उठले. कमलाकर मला निरोप देण्या-साठीं बाहेरपर्यन्त माझ्याबरोबर आले. तिथं बैठकीच्या खोलींत थोडा-वेळ बोलण्यासाठीं मला थांबावं लागलं. कमल माझ्या मागोमागच होती. कुठुनसं तिनं एक सुंदर वेष्टनाचं पुस्तक बाहेर काढलं.

" पप्पा " ती म्हणाली, " तुमच्या कवितांचं एक पुस्तक बाईंना देऊ का ? "

कमलाकरांची मुद्रा गोरीमोरी झाली. त्यांना तो प्रकार आत्मश्लाघेचा वाटला असावा. कमलकडे थोड्या कानउघडणीकीच्या नजरेनेच त्यांनी पाहिलं. नंतर हंसण्याचा प्रयत्न करीत ते म्हणाले,

" दे कीं "

माझ्याकडे वळून ते पुढे उद्गारले,

" कधींकाळी केल्याहेत या कविता. उत्साहाच्या भरांत छापून काढल्या. त्यात काव्य मात्र आढळणार नाहीं. झोप येईनाशी वाटेल तेव्हां हमखास उपयोगी पडेल हा संग्रह तुम्हांला. "

आणि मग आपल्याशीच ते मोठ्याने हसले. त्यांच्या त्या हास्यांत निराशेबरोबरच आत्मविश्वास आणि इतरांचं मन झक मारतं असा भावहि असावा असा मला भास झाला.

या हाडाच्या कवीला रंगेल 'लावणी' कांहीं मिळाली नव्हती. गद्य कन्हेरीवरहि तो खुष असता. पण झालं होतं विपरीतच. त्याला मिळाली होती वरवर आकर्षक वाटणारी पण हात लावतांच बोचणारी आणि दर्प सोडणारी कोरांटी. या कोरांटीमुळं तो रक्ताळला होता व त्याच्या जीवनाची चवहि बदलली होती.

कमलाकरांची आणि माझी पुढं पुढं अनेकदां गांठ पडली. स्मितमुखानं आम्ही परस्परांना अभिवादन करीत असूं. क्वचित बोलण्यासाठीं थबकलो असू. कमलाकरांच्या कविता मला आवडल्या होत्या व तसं मी त्यांना बोलूनहि दाखविलं होतं. एकदा श्रीकान्त बरोबर असतांना आमची गाठ पडली होती व श्रीशी ते मनमोकळेपणें बोलले होते. प्रत्येक भेटीच्या वेळीं मी त्यांना घरीं येण्याचं निमंत्रण दिलं होतं...निमंत्रणाचं स्मरण दिलं होतं. पण ते कांहीं आमच्याकडे आले नव्हते.

या गोष्टीला दीड वर्ष होऊन गेलं होतं.

आणि आज अचानक ते दत्त म्हणून माझ्या बिऱ्हाडी येऊन ठाकले होते.

मी दचकले याचं कारण हें असं होतं.

"या," मी हसून त्यांचं स्वागत केलं आणि पदर लपेटीत बाजूला सरले.

कमलाकरहि थोडे भांबावले. माझा नूर त्याला कारण होता. बिचकतच ते आंत आले.

" आपली गैरसोय तर नाहीं ना होत ?" हंसण्याचा प्रयत्न करीत त्यांनी विचारलं.

" छे छे " मी लगबगीनं उत्तरले. त्यांचा कांहींतरी गैरसमज झालेला दिसत होता. " गैरसोय कसली· वेळ जात नव्हता उन्हाचा. तुम्ही आल्यानं दोन गप्पा तरी करता येतील. कंटाळा यायला लागला होता. तशांतून श्री घरीं नाहींत......बसा ना. "

" बाहेर गेलेत उन्हाचे ?" खुर्चीवर बसत कमलाकरांनीं पृच्छा केली.

" नव्हे. गांवाला गेले आहेत ऑफिसच्या कामासाठीं. दोन दिवस येणार नाहींत. " मी खुलासा केला.



## शब्द कोडगे

नशिबाच्या या दर्यावरती द्या लोटुन होडगें
चला या होउं शब्दकोडगे !
विधान शोधूं पुस्तकांतरीं उगारून सोडगे
मजकूरावर पडूं तुटोनी जसे कांहिं लांडगे
हा किंवा तो शब्द हेरण्या काढुं सर्व तोडगे
चला या होउं शब्दकोडगे !
(चाल) 'ते प्रसिद्ध मुद्रक' घोडके किं शेडगे ?
'बहु सांभाळावा' फोड गे कि मोड गे ?
(मोटार मात्र ही, 'डॉज'—नव्हे दोडगे)
करोनि माथाकूट वाळवूं अकलेचे सांडगे
रुपयांच्या पत्रिकाहि वाहूं—भाजुनिया रोडगे
द्रव्यकुंभ जिंकितां नये तरि निदान तें गाडगें !
चला या होउं शब्दकोडगे !

—एकू

" मला वाटलं भेटतील श्रीकान्त आज सुटीचे ", कमलाकर अस्वस्थपणें म्हणाले.

" त्यांच्याशीं काम होतं कांहीं ! " शंका घेऊन मी विचारलं.

" काम कसलं " कमलाकर उत्तरले. " सहज आलो होतो तुम्हालाच भेटायला. श्रीकान्त असते तर... "

" मग बिघडलं कुठं " मी त्यांचा अस्वस्थपणा घालविण्यासाठीं म्हणाले, "आलात याचा मला आनंद वाटतो. श्री आल्यावर पुन्हा या."

मऊ खुर्चीवर कमलाकर अंग चाळवून मोकळेपणी बसण्याचा प्रयत्न करीत होते. उन्हांतून आल्यामुळं त्यांचा गव्हाळा वर्ण अबोली रंगाचा झाला होता. आकाशी भिंतीच्या पार्श्वभूमिवर त्यांचा गोल चेहरा पौर्णिमेचा चंद्र उगवतांना दिसावा तसा दिसत होता. हळूहळू मुद्रेवरची संकोचाची भावना संकोचित होत होती. माझ्याकडे न पाहता ते खोलींतल्या वस्तूंकडे पाहण्याचा प्रयत्न करीत होते. माझं बिऱ्हाड त्यांच्या बिऱ्हाडापेक्षा लांबीरुंदीनं कमी असलं तरी स्वच्छ, नीटनेटकं, थंड आणि प्रसन्न होतं. मला वाटतं हीच तुलना ते मनांत करीत असावेत.

कमलाकरांचं निरीक्षण चालूं असतांच मीहि त्यांचं निरीक्षण करीत होते. ते आपल्याकडे आले याबद्दल मला आनंद वाटला होता. पण त्याबरोबरच हा हाडाचा कवि, सुखवस्तू उत्पन्न असलेला, असा उन्हाचा घराबाहेर पडावा व एखाद्या परिचिताच्या सहवासांत वेळ घालविण्याची त्याला इच्छा व्हावी याचं आश्चर्यहि मला वाटत होतं.

खरंच कमलाकरांची पत्नी आपल्यासारखी असती तर तिनं त्यांना असं या वेळी, एकटं बाहेर पडूं दिलं असतं का ? आणि

अनुक्रमणिका








त्यानाहि अशी इच्छा झाली असती का ?...त्या दिवशीं ओझरतंच मी त्यांचं घर आणि गृहसौख्य पाहिलं होतं...तें घर नव्हतं...एक तुरुंग होता....कुटुंबरूपी सापळा होता.

माझे हे विचार आणि निरीक्षण चालू असताच माझा वक्षावरचा पदर खाली घरंगळल्याचं कांहीं माझ्या लक्षांत आल नाहीं. मला कांहींतरी सांगण्यासाठी कमलाकर माझ्याकडे वळले आणि दचकल्यासारखे एकदम दुसरीकडे पाहू लागले तेव्हां कुठं तें माझ्या ध्यानांत आलं.

मला खूप बरं वाटलं. माझ्या अंगोपांगांचं प्रदर्शन करण्यासाठीं मुद्दाम कांहीं तो प्रकार मी केला नव्हता. कमलाकरांच्या जागी दुसरा कुणी असता तर तो कसा वागला असता कोण जाणे ! मला आमच्या यांच्या एका मित्राची आठवण झाली. काय त्याची ती नजर ! जणू दुष्काळातून हपापून आलेली. माझ्याकडे टक लावून तो पाहू लागला कीं मला त्याची शिसारीच येते. वाटतं त्याला सांगावं,

" भल्या माणसा, जाणती स्त्री हृदयं अशी टक लावून पाहाण्यानं आणि मोराच्या पिसाऱ्यासारख्या कपड्याच्या लखलखाटानं विद्ध होत नसतात. "

जणूं विशेष असं कांहींच घडलं नाहीं असं भासविण्यासाठी मी पदर किंचितसा वर उचलला. एकदम शरमल्या वरमल्यासारखी अशा वेळीं मी वागत नाहीं. कमलाकरांच्याहि तें लक्षांत आलं. त्याचा संकोच नाहींसा झाला व माझ्याकडे पहाण्याचा धीटपणा त्यांच्यात आला.

पण थोडावेळच.

लगेच ते जायला उठले.

मला त्यांची दया आली. एखादा अतिथी दाराशी यावा व तसाच जाऊं निघावा, अशावेळी जे वाटेल तें मला वाटलं होतं. आपला थोडासा का होईना वेळ चांगल्या तऱ्हेनं, आनंदात घालवावा, मनमोकळेपणानं बोलावं यासाठींच कमलाकर माझ्याकडे आले होते यात शंका नव्हती. पण मी एक परस्त्री आहे व घरात एकटी आहे हा विचार त्याना अस्वस्थ करणारा ठरला असावा.

मी मनाशी कांहीतरी निश्चय केला. कमलाकरांचं मन, मनाच्या ओलाव्यासाठी तहानलेलं मला स्पष्ट दिसत होतं. कदाचित आज घरात कांहींतरी समरप्रसंगहि त्यांना अनुभवावा लागला नसेल कशावरून ? त्या दिवशींचा, अभावित कानावर पडलेला त्यांचा व त्याच्या पत्नीचा तो जळजळीत संवाद मला आठवला. माझं मन करुणेनं भरून आलं. स्त्रीच्या मृदुमुलायम प्रेमासाठीं एखाद्या जखमी पक्ष्याप्रमाणं तडफडणारं ते कवि मन मला स्पष्ट दिसूं लागलं. जखमी पक्षाला आपण आंजारून गोंजारून त्याचं दुःख कमी करण्याचा प्रयत्न नसता का केला ? मग या मानवी पक्षानं कोणतं पाप केलं होतं ? गिधाडासारखा लचके तोडण्याच्या इच्छेने कांहीं तो आलेला नव्हता.

"बसा हो", मी आग्रहाने म्हणाले. " काम तर नाही ना गडीचं ?"

" उलट वेळ कसा घालवावा हाच प्रश्न आहे. " हंसून कमलाकर उत्तरले. खरं तेंच त्यांच्या भावुक्या मनानं बोलून दाखविलं होतं.

" मग बसा " मी मोकळेपणी बोलले. "घरच्यासारखें, तो कोट काढा म्हणजे उष्मा तेवढांच कमी होईल. बाहेरून आलात ना ! "

कमलाकरांच्या डोळ्यांत कृतज्ञता तरळूं लागली. कोट काढून तो त्यांनी खुर्चीला अडकविला. मानेजवळचा घाम रुमालाने टिपीत ते खुर्चीवर विसावले. त्यांच्या मुद्रेवरची संकोचाची छटा वितळू लागली होती. उन्हानं तांबूसलेला त्यांचा वर्ण बराच उजाळला होता. वाऱ्याचा झोत त्यांच्याकडे जाईल अशा बेतानं मी पंखा फिरविला. त्या गार झोतानं त्यांच्या मुद्रेवर समाधानाचं स्मित तरळूं लागलं.

' कुठं भटकत होता उन्हाचे ? घरून रागावूनच निघालेला दिसता... होय ना ? ' मी मस्करीच्या स्वरांत खडा टाकून पाहिला.

कमलाकरांची मुद्रा कावरीबावरी झाली.

" तुम्हाला कसं समजल. " त्यांनी विचारलं. " आमची कमल तर नव्हती ना आली इकडे ? "

मला हसूं लोटलं. पण तें कुत्सित अथवा हेटाळणीचं नव्हतं.

' आपली अंदाजाने म्हणतेय मी ' मी खुलासा केला. ' कमल आली नव्हती. आणि ती कधी येतहि नाहीं.

" तुमचा अंदाज कांही चुकला नाहीं " कमलाकर उत्तरले, " फारच करीत असते आमची ही नाहीतरी, केव्हां केव्हां. मग पडतो झालं बाहेर. बाहेरच जेवलो, उरलेला वेळ कुठं काढायचा हा प्रश्न होता. म्हटलं बऱ्याच दिवसापासूनचा तुमचा आग्रह आहे, तेव्हां आपल्याकडे तरी जाऊन यावं...उगीच तुम्हाला त्रास."

" त्रास मुळींच नाहीं वाटत मला." मी लगबगीनं म्हणाले. "अशाहि मनःस्थितींत तुम्ही इकडे आलात याबद्दल उलट आनंद वाटतो मला. स्वस्थ निवांत बसा. मनावरचा सारा ताण काढून टाका. "

" टाका म्हटल्यावर कांही गोष्टी टाकता आल्या असत्या तर किती बरं झालं असतं." कमलाकर सुस्कारा टाकून उद्गारले. त्यांच्या डोळ्यांत पाणी तरळल्याचा मला भास झाला.

मला खूप खूप वाईट वाटलं. खरंच भावनाशील माणसाचं सुख त्याच्या एकट्याच्या हातात नसतं. सुखाची टाळी एका हातानं वाजत नसते. आणि दुसरा हात विसंवादी अथवा भाडोत्रीहि चालण्यासारखा नसतो.

" दुधाचं थंड कोल्ड्रिंग करून घेणार होते मी " इतक्यात मी म्हणाले. " तुम्हाला चालेल की चहा टाकू ?" मी विचारलं.

" मला काहींहि चालेल. आणि कांहीं नसलं तरी चालेल ", कमलाकर उत्तरले.

मी उठले आणि थंड पेय तयार करण्याच्या खटपटीला लागले. एका छानशा मातीच्या भांड्यांत दूध मी अगोदरच गार करायला ठेवलं होत. दूध, पाणी आणि सरबत एकत्र करून सुंदर गुलाबी कोल्ड्रिंक मीं तयार केल. माझ्या हालचालींकडे आणि प्रत्येक कृतीकडे कमलाकर कौतुकाने आणि रसिकतेने पाहू लागले. थंड पेयाचा पेला मी त्यांच्या हाती दिला तेव्हां माझ्या बोटांचा ओझरता स्पर्श




त्यांच्या बोटांना झाला तेव्हां ते शहारल्याचा भास मला झाला. पेय हातीं घेतांना एक टक तें आपल्याकडे पहात आहेत असं मला वाटलं. कदाचित तसा भास मला झाला असेल.

नंतर परकेपणाचे सगळे बंद तटातट तुटून पडले. कमलाकर माझ्याशीं मोकळेपणाने बोलूं लागले. आपल्या जीवनाची सारी परवड त्यांनी मला कथन केली. सर्व कांहीं त्यांना अनुकूलता होती. त्यात त्याना समाधान होतं. पण या दुधाच्या पातेल्यांत एक मिटाचा खडा पडला होता. त्यांची पत्नी त्यांच्याशी समरस झाली नव्हती; होण्यासारखी नव्हती, होण्याची शक्यताहि नव्हती. एखाद्या हाड वैरिणीसारखी ती त्यांच्याशी वागत होती आणि तें सगळं त्यांना सहन करावं लागत होतं. यातून सुटायला मार्ग नव्हता.

"नशीब दुसरं काय !" त्यांनी समारोप केला आणि आपल्या हाताच्या तळव्याकडे ते पाहूं लागले. "यातून सुटायला एकच मार्ग मरण." ते उद्गारले.

मी शहारले. मरणाच्या गोष्टी मला आवडत नाहींत. इतकेंच नव्हे तर कमलाकरांसारखी लायक माणसं मरणाच्या गोष्टी करूं लागावीत व नालायक माणसं दीर्घायुषी व्हावीत अथवा मरणानं त्यांच्याकडे पाहू नये याचेहि मला वैषम्य वाटतं. विषय बदलण्यासाठीं मी म्हणाले,

"भविष्य समजतं वाटतं तुम्हाला हस्तरेषांवरून ?...माझा तरी हात बघा." मी हात पुढें धरला.

कमलाकर माझ्याकडे पाहूं लागले. भीतभीत त्यांनी माझा हात हातीं घेतला. तो त्यांनी सपाट केला. त्यावरील रेषांवरून त्यांनीं हळूवार बोट फिरविलं, हळूवारपणें तो त्यांनी दाबला. खुर्ची त्यांनी जरा पुढें ओढून घेतली.

"इतक्या भाग्यवान आहेत तुमच्या हातावरच्या रेषा" ते म्हणाले की "माझ्यासारख्या दुर्भाग्याची त्यांना दृष्ट लागायची एकादेवेळीं."

एकटक ते माझ्याकडे पाहू लागले. त्यांचा हात माझ्या तळहातावरून फिरू लागला. मधूनच तो माझ्या बाहूवर विसावत होता. मी कांहींच प्रतिकार केला नाहीं. हात ओढून घेतला नाहीं. हळूच त्यांनीं तो वर उचलला आणि आपले उष्ण ओठ त्यानी त्यावर टेकविले.

आणि मग ते स्वत.च स्वतःच्या या कृतीनं अस्वस्थ झाले. घाबरले. माझा हात सोडून देऊन ते ताडकन् उभे राहिले.

"माफ करा" ते उद्गारले. "तुम्ही मला नीच, पशु समजत असाल नाहीं ? उपकाराची फेड मी अपकारान, नीच प्रकारानं करीत आहे....चुकलो मी. माफ करा मला." ते कोट अंगात चढवू लागले.

"मला असं कांहींच वाटलं नाही आणि वाटणारहि नाहीं. तुम्ही थोर आहात, निष्पाप आहांत आणि उच्च विचारी आहांत असंच मी समजते." मी शांतपणें एका एका शब्दावर जोर देत म्हणाले.

अवाक् कमलाकर माझ्याकडे पहातच राहिले. कोट त्यांच्या हातांतून खाली गळून पडला. समोर राजबिंड्या श्रीकान्त शेजारी

माझा फोटो होता. त्या दोन्ही फोटोंकडे व माझ्याकडे ते आळीपाळीने पाहूं लागले. स्त्री मनाचा थांग त्यांना लागेना. लागणंहि शक्य नव्हतं.

"आश्चर्य वाटतं तुम्हाला ?" मी विचारलं.

"नाहीं" ते खुर्चीवर बसत उत्तरले—

"थोडा थोडा प्रकाश माझ्या डोक्यांत पडूं लागला आहे... माझ्यासाठी, केवळ माझ्या दुखावलेल्या मनासाठीं दयाबुद्धीनं तुम्ही हें सारं करीत आहांत."

माझ्या ओठांवर हसूं तरळलं.

"दया नाहीं" मी म्हणाले "अन् प्रेमहि नाहीं. दया आणि प्रेम या निरपेक्ष दुसरं कांहीं असू शकत नाही का ?" मी प्रश्न टाकला.

"असूं शकेल" कमलाकर उत्तरले. "पण त्या भावनेचं नांव मला माहीत नाहीं."

"आणि मलाहि ते माहीत नाहीं" "मी म्हणाले." आपलं कवि मन चालवून शोधा नांव सावकाशीनं."

एका सुस्कान्याबरोबर मनाची सारी अस्वस्थता त्यांनी झटकून टाकली. पुन्हा त्यांची कळी खुलू लागली त्यांचं कवि मन जागृत होऊं लागलं, साऱ्या विवंचना आणि अप्रिय वास्तवता विसरून ते जिवंत होऊं लागलं.

अकरा वाजेपर्यंतचा वेळ कसा गेला तें आम्हाला समजलं नाहीं. नंतर ते जायला उठले तेव्हां दूर कुठे तरी बाराचे तास वाजत होते. चंद्र माथ्यावर येऊन तळपत होता.

त्यांच्या जाणाऱ्या पाठमोऱ्या आकृतीकडे मी पाहू लागले. तृप्त होऊन जाणाऱ्या एखाद्या सत्पात्र अथितीकडे दानशूर यजमानानं पाहावं, आपलं दान सत्पात्री पडलं, सत्कारणी लागलं असं मनोमन समाधान मानावं तसं माझं तें पहाणं होतं. आपला कांहींहि अपराध नसतांना जीवनांतील कांहीं सुखांना पारख्या झालेल्या एका लायक कलावंत मनाला मी सुखाचं दान दिलं होत. चित्रगुप्ताच्या वहीत दान सदरांत त्यांची नोंद कदाचित होणारहि नाहीं. पण मला त्याची पर्वा नाहीं.

• • •










राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# भारताची पहिली क्रांतिकारक महिला

— बाळ जेरे

*झांशीची राणी लक्ष्मी, चितोडची पद्मिनी, या भारतीय वीरांगनाचा आदर्श दृष्टिसमोर ठेवून-वैभवावर लाथ मारून-भारतीय स्वातंत्र्य-समरांत "अन्याय्य सत्तेचे तुकडे तुकडे करणे म्हणजेच परमेश्वराची आज्ञा पाळणें होय" असे जीवनाच्या अंतापर्यंत उद्गार काढणाऱ्या* **श्रीमति कामांचें** *हें पुण्यस्मरण……*

"हिंदुस्थानांत ब्रिटिशांची सत्ता चालू राहाणें ही गोष्ट भारतियांच्या हिताच्या दृष्टीनें निर्विवाद घातक आणि अत्यंत अपायकारक आहे. जगांतील लोक-संख्येच्या एकपंचमांश लोकसंख्या ज्या देशाची आहे त्या हिंदुस्थानसारख्या दलित देशांतील या लोकांना दास्यमुक्त करण्याच्या कामीं जगांतील सर्व स्वातंत्र्यप्रेमी लोकांनीं सहकार्य केलें पाहिजे., कारण जगाची सामाजिक घडी निर्दोष स्थितीप्रत पोंचवावयाची असेल तर एक गोष्ट अत्यंत आवश्यक आहे आणि ती म्हणजे कोणताहि लोकसमाज अन्याय्य आणि अनियंत्रित राज्यव्यवस्थेच्या अंकित असतां कामा नये हीच होय.

१९०७ च्या दिनांक १९ नि २० ऑगस्टला जर्मनींतील स्टूटगार्ट येथें भरलेल्या आंतरराष्ट्रीय समाजवादी मेळाव्यांत भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासांत अगदीं पहिल्यांदाच मांडला गेलेला हा ठराव आहे. आणि तो ठराव त्या आंतरराष्ट्रीय समाजवादी मेळाव्यांत मांडून सर्वानुमते संमत करून घेणाऱ्या पहिल्या सशस्त्र क्रांतिकारक महिला श्रीमती भिकाजी रुस्तुम कामा या होत.

वास्तविक पाहतां श्रीमती कामाबाईंचा मूळ पिंड कांहीं राजकारणी नव्हे. त्यांच्या माहेरच्या किंवा सासरच्या कुळांत त्यांच्या पिढीपर्यंत कोणी कोणत्याहि प्रकारच्या राजकारणांतच काय पण सामाजिक कार्यांतहि उतरलेले आढळत नाही. नामवंत विधिपंडित म्हणून ख्याती पावलेल्या एका सधन विधिपंडिताची पत्नी म्हणून त्यांनीं जवळ जवळ वयाच्या चाळीस वर्षांपर्यंत संसार केला. चार अपत्यांची माता झाल्यानंतर मुंबईतील ग्रंथीज्वराच्या साथींत त्यांनीं तन-मन-धनानें जनतेची जी रुग्णशुश्रुषा केली त्यामुळें हिन्दुस्थान त्यांना भारताची फ्लॉरेन्स नायटिंगेल म्हणून ओळखूं लागला. स्वतःचें रुग्णालय उघडून त्यांत स्वतः दायीपासून डॉक्टरपर्यंत अत्यंत आस्थेने सेवाशुश्रुषा करणाऱ्या कामाबाईंना 'दीपकन्या' ही पदवी देऊन हिंदुस्थानांतील त्यावेळच्या ब्रिटिश सरकारलाहि गौरवावे लागलें. पण हा गौरव त्यांना फार काळ उपभोगता आला नाही. त्यांना स्वतःलाच जेव्हां ग्रंथीज्वरानें पछाडले तेव्हां रोगमुक्त होतांच प्रकृति सुधारण्यासाठीं डॉक्टरांनी त्याना परदेश प्रवासाची अनुज्ञा दिली.

या अनुज्ञेप्रमाणें परदेशचें प्रस्थान ठेवतांना श्रीमती कामाबाईंनी केवळ मायदेशाचाच निरोप घेतला नाहीं तर आपला ख्याली-खुशालींत लोळणारा, खाण्यापिण्याचीच चैन करणारा ध्येयहीन विलासी पती, चार मुलें आणि गडगंज संपत्ती या सर्वांचाच त्याग केला. प्रकृति सुधारण्यासाठीं युरोपांतील निरनिराळ्या देशांतून प्रवास करतांना कांहीं कांहीं ठिकाणीं भारतीय स्वातंत्र्य-चळवळीचीं केंद्रें कार्यान्वित असलेलीं त्यांना आढळून आलीं. आणि लंडनमध्यें येतांच डॉ. दादाभाई नवरोजी यांच्या पक्षाची दीक्षा घेऊन नेमस्तांच्या भूमिकेवरून त्यांनीं राजकारणाला प्रारंभ केला. डॉ. दादाभाई





अनुक्रमणिका

नवरोजी यांच्या ब्रिटिश लोकसभेच्या निवडणुकींत अविश्रांत परिश्रम घेऊन त्यांनीं आपल्या कार्याचा श्रीगणेशा गिरविला. पण पांच वर्षेपर्यंत पार्लमेंटमध्यें राहूनहि दादाभाई-सारखा मोहरा जेव्हां कांहीच करूं शकला नाही, तेव्हां सुधारणांनी पायरीपायरीनें ब्रिटिशांच्या चांगूलपणामुळें मिळणाऱ्या स्वातंत्र्याच्या कल्पनेवरील त्यांचा विश्वास पार उडाला आणि त्या पं. श्यामजी कृष्ण वर्मा यांच्या होमरूल लीग चळवळीत प्रविष्ठ झाल्या. होमरूलची चळवळ ही नेमस्तांच्या पुढें एक पाऊल होती. सुधारणांच्या पायरीपायरीनें मिळणाऱ्या स्वराज्याच्या दानावर त्यांचा विश्वास नव्हता. तेव्हां देशकालपरत्वें हातीं मिळतील त्या साधनांनी इंग्रजांकडून स्वराज्य मिळवावयाचें हें त्यांचें ध्येय होते. या पक्षाच्या वतीनें फ्रान्स, आयर्लंड, अमेरिका इत्यादि देशांतून व्याख्यानें देतांना कामाबाई स्पष्टपणें सांगत कीं, भारतीय स्वातंत्र्याच्या पक्षाचे आम्हीं क्रांतिकारक आहोंत. पण आमची क्रांति ही शांततामय नि रक्तहीन आहे.

पुढें १९०६ मध्यें बॅ. विनायक दामोदर सावरकर यांचें विलायतेंत आगमन नि भारत-भवनांत वास्तव्य झालें. तेव्हांपासून तेथील भारतीय राजकारणांत एक निराळेंच चैतन्य संचारूं लागलें. सावरकरांच्या सभोंवतीं त्यांच्याच जाज्जहाल विचारांचा गट जमा होत गेला. भारताला ब्रिटिशांच्या दास्यांतून मुक्त करण्याचा एकमेव मार्ग म्हणजे शस्त्राचार–सशस्त्र क्रांति यावर त्यांचा पूर्ण विश्वास बसला. पंडितजी जहाल विचारांचे असले तरी सावरकरांच्या नि त्यांच्या मतांत व विचारसरणींत अंतर असे. पंडितजींना सावरकरांच्या सशस्त्र क्रांतीची धार झेपत नसे. पण एके दिवशीं तेहि अभिनव भारताचे शपथबद्ध सभासद झाले. पंडितजी–सावरकरांच्या The Indian Socioligist मधल्या लेखांवर चर्चा होत त्यावेळीं कित्येकदां श्रीमती कामाबाई तेथें उपस्थित असत. भारतीय स्वातंत्र्यासंबंधीची सावरकरांची कल्पना, तें प्राप्त करून घेण्यासंबंधीचे त्यांचे मार्ग, तर्कशुद्ध विचारसरणी पाहून हळूहळूं कामाबाई सावरकरांच्या पक्षाकडे वळूं लागल्या होत्या. पंडितजींच्या पाठोपाठच एके दिवशी कामाबाईंनीहि 'अभिनव भारता'ची प्रतिज्ञा सावरकरांपासून घेतली आणि नेमस्त राजकारणापासून त्यांनी केलेला राजकीय कार्याचा आरंभ अंतीं जहाल म्हणजे सशस्त्र क्रांतीवर येऊन स्थिरावला.

'अभिनव भारता'ची प्रतिज्ञा घेऊन शपथबद्ध सदस्या होतांच त्यांच्यावर जी महत्वाची कामगिरी सोंपविण्यांत आली ती जर्मनीतील स्टूटगार्ट येथें भरणाऱ्या आंतरराष्ट्रीय समाजवादी मेळाव्यांत 'अभिनव भारता'च्या वतीनें स्वतंत्र भारताचें प्रतिनिधित्व यशस्वीपणें पार पाडण्याची. या कार्यांत बॅ. सरदारसिंगजी राणा यांना त्यांचें सहकारी म्हणून धाडण्यांत आलें होतें. तरी त्या मेळाव्यांत आरंभी दिलेला ठराव मांडून, त्यावर तेजस्वी भाषण करून तो तेथें संमत करून घेण्याचें कार्य श्रीमती कामाबाईनींच स्वतः पार पाडलें. या मेळाव्यांत इतर सर्व राष्ट्रांचे प्रतिनिधि आपापल्या राष्ट्रांचे राष्ट्रध्वज डौलानें फडकावतील नि मग आपल्याला राष्ट्रध्वज आहे कां म्हणून विचारल्यानंतर काय उत्तर द्यावयाचें या विचारानें कामाबाईनीं मेळाव्याच्या आदल्याच रात्रीं आपल्या मौल्यवान रेशमी साडीचा पदर फाडून एक तीनरंगी ध्वज बनविला. परंतु ते रंग कोणत्याहि जाती–धर्माचे किंवा पंथाचे निदर्शक नसून गुणांचे निदर्शक होते. तांबडा वर्ण शक्तीचा निदर्शक, केशरी रंग विजयाचा निदर्शक आणि हिरवा रंग धैर्योत्साहाचा निदर्शक होता. भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासांत स्वतंत्र भारताचा तिरंगी राष्ट्रध्वज म्हणून जो अगदी प्रथम फडकला तो हाच तिरंगी ध्वज होय. या ध्वजावर या तीन रंगांविना आठ कमळें चितारलेलीं असून तीं हिंदुस्थानातील आठ प्रांतांची निदर्शक आहेत. सूर्य-चंद्राच्या आकृतीहि या ध्वजावर चितारलेल्या आहेत. स्वतंत्र भारताचा राष्ट्रध्वज म्हणून कामाबाईनीं हा ध्वज त्या मेळाव्यांत फडकविला असला तरी हा तात्पुरता म्हणून आहे. स्वतंत्र भारताची राज्यघटना जो ध्वज ठरवील तो नंतर आपण मान्य करूं असेंहि त्यांनीं त्याचवेळीं स्पष्टपणें सांगितलें होतें.

युरोपांतल्या भिन्नभिन्न देशांतील समाजवादी पुढारी समाजवादी तत्वज्ञानाकडे यावेळीं कसकसे पहात असत याची अंधुक कल्पना या मेळाव्याच्या उपलब्ध असलेल्या त्रोटक वर्णनावरून येते ! या कॉंग्रेसमध्यें हिंदुस्थानचा प्रश्न मांडण्याचा प्रसंग आला. तेव्हां रॅम्से मॅक्डोनाल्ड प्रभृति लोकांनी प्रथम प्रथम त्याला विरोधच केला होता; पण हिंडमन, जॅरिस प्रभृति लोकांचा हिंदी प्रतिनिधींना भरपूर पाठिंबा मिळाल्यामुळें, या आंतरराष्ट्रीय मेळाव्यांत हिंदुस्थानसंबंधींचा वर उल्लेखिलेला महत्त्वाचा ठराव संमत झाला. हा ठराव मांडण्यापूर्वीं श्रीमती कामाबाईनीं मोठ्या धैर्यानें 'वंदेमातरम्'चा जयघोष करून स्वतंत्र भारताचा हंगामी राष्ट्रध्वज डौलानें फडकविला तेव्हां तेथें उपस्थित असलेल्या जगांतील स्वतंत्र राष्ट्रांच्या ५००–६०० प्रतिनिधींनीं उभें राहून त्याला वंदन केलें. जमलेल्या सर्व प्रतिनिधींना असे वाटलें कीं, ही कोणी तरी राजघराण्यांतील तरुणी असली पाहिजे.

या ठरावावर कामाबाईनीं जें भाषण केलें तें अत्यंत खणखणीत नि लाव्हारसानें भरलेलें आहे. हिन्दुस्थानांतील द्रव्य लुटून प्रतिवर्षी अब्जावधि पौंड इंग्लंडमध्यें येतात व त्यामुळें हिन्दुस्थान दारिद्र्याच्या परमावधीला जाऊन पोचलेला आहे ही गोष्ट विस्तारानें मांडल्यानंतर कामाबाई त्या मेळाव्यांतील उपस्थित प्रतिनिधींना उद्देशून म्हणाल्या, "उठल्या-सुटल्या तुम्ही लोक वसाहतींसंबंधी चर्चा करता पण हिन्दुस्थानसारख्या परायत्त देशाची वाट काय !" समाजवादी नेत्यांनी नि जनतेनेंहि हिंदुस्थानच्या प्रश्नाकडे सतत लक्ष दिलें पाहिजे अशी विनंती करतांना कामाबाई म्हणाल्या, "तुम्ही न्यायाचा पक्ष घ्या आणि प्रत्येक समाजवादी मेळाव्यांत हिंदुस्थानचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें मांडावयाचाच, असा निर्धार करा."

१९१० मध्यें सावरकर पकडले गेल्यानंतर कामाबाई फ्रान्समध्यें गेल्या. स्वतंत्र राष्ट्र म्हणून फ्रेंच सरकारला त्यांनीं राजनिष्ठेचें वचन दिलें नि तें शेंवटपर्यंत पाळलें. त्यांनी या पुढचा आपला कांहीं काळ व आपला पैसा सावरकर मुक्तता समितीसाठीं अतोनात व्यय केला. मार्सेलिस प्रकरणीं फ्रेंच सरकारनें जी भेकड वृत्ति दाखविली त्याचा खरपूस समाचार वंदेमातरम् पत्रांत घेऊन सावरकरांवर अन्याय करणाऱ्या फ्रेंच पंतप्रधानानीं त्यागपत्र द्यावें अशी चिथावणी त्यांनीं फ्रेंच तरुणांना दिली. हेगच्या न्यायालयांत सावरकरांना न्याय मिळावा म्हणून भगिनी कामांनी नामांकित फ्रेंच नि रशियन विधिज्ञांची भेट घेऊन पाण्यासारखा पैसा ओतला. पण तो सर्व पाण्यांत गेला तेव्हा







हेगच्या त्या अन्याय्य निर्णयावर त्यांनीं 'बारयोषितेचे नीच चाळे' या शीर्षकाखालीं खरमरीत टीका केली. पण या निर्णयामुळें त्या स्वतः हताश किंवा पश्चात्तप्त झाल्या नाहींत.

कामाबाईंच्या झंझावाती नि प्रक्षोभक भाषणांमुळें युरोप–अमेरिकेंतील लक्ष लक्ष प्रती खपणाऱ्या नामवंत वृत्तपत्रांनी अर्ध्या अर्ध्या पृष्ठांची कामांची मुखपृष्ठावर छायाचित्रें देऊन, भडक मथळे नि विस्तृत प्रतिवृत्ते देऊन व त्यावर संपादकीय स्फुटें लिहून व जोन ऑफ आर्क नि श्रीमती कामा यांचीं छायाचित्रें शेजारी शेजारी देऊन त्यांना प्रसिद्धी दिली. त्यांनीं जॉर्ज वॉशिंग्टन, फ्रेंच कारक नि मॅसिमी यांच्या कार्यपद्धतीचा अवलंब करून ब्रिटिश सरकार उलथून पाडण्याचा प्रकट प्रचार व्यासपीठावरून केला. जॉर्ज वॉशिंग्टन नि अमेरिकेनें ज्या पद्धतीनें ब्रिटिश सत्ता झुगारून देऊन स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलें त्या पद्धतीचा मनापासून गौरव करणाऱ्या कामाबाईंच्या निःस्वार्थी व तेजस्वी व्यक्तिमत्वाची प्रभावी छाप पडल्यानें अमेरिकन पत्रें नि जनता त्यांच्यावर एवढी प्रसन्न झालेली होती कीं त्यांच्या व्याख्यानांना लक्षावधि लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटत. अर्थातच स्वतःला नकळतच कामाबाईंना आंतरराष्ट्रीय कीर्ति प्राप्त झाली. ठिकठिकाणांहून व्याख्यानांसाठी शेंकडो निमंत्रणें येत. भारतीय स्वातंत्र्य-युद्धाच्या प्रत्येक कटांत त्यांनीं भाग घेतलेला होता. त्या जन्मानें पारशी असल्या तरी गीताभ्यासी नि हिंदुत्वाच्या प्रखर अभिमानी होत्या. पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून झांशीची राणी, पद्मिनी यांच्याप्रमाणें भारतीय स्त्रियांनीं स्वातंत्र्ययुद्धांत लढलें पाहिजे असा त्यांचा कटाक्ष होता.

दिनांक २४ सप्टेंबर १८६१ ला मुंबईतील एका धनाढ्य पारशी घराण्यांत जन्मलेल्या आणि नामवंत विधिपंडितांच्या पत्नी म्हणून विलासांत लोळणाऱ्या कामाबाईंनीं वयाच्या पंचेचाळीस वर्षानंतर राजकारणाला जो प्रारंभ केला तो अखंड, अव्याहत नि अविश्रांत मरेतों सातत्यानें चालू ठेवला होता. उतार वयांत शरीराच्या क्षीणतेसमवेतच सर्वच बाजूंनी क्षीण झालेल्या कामाबाईंना मरतांना मायदेशाच्या भूमीवर–मातृभूमीच्या मांडीवर डोकें ठेवून मरण्याची इच्छा होती. पण कॉंग्रेस मंत्रिमंडळें देशांत अस्तित्वांत असतांनाहि त्यांना भारत–प्रवेशाची अनुज्ञा मिळाली नाहीं. बॅ. सरदारसिंगजी राणा नि नारायणराव सावरकर (वीर सावरकरांचें बंधु) यांच्या चिकाटीच्या प्रयत्नानें शेवटीं १९३६ मध्यें त्याना भारत–प्रवेशाची अनुज्ञा मिळाली. यावेळीं त्यांच्या वयानें पंचाहत्तरी उलटलेली होती. वाऱ्यानें विझत चाललेल्या ज्योतीप्रमाणें या अभागी वीर भगिनीनें मातृभूमीच्या मांडीवर पाय ठेवतांच तिचें लोळागोळा झालेलें शरीर खालीं कोसळलें तें पुन्हां वर उभें राहिलें नाहीं. मरतां मरतां याहि अवस्थेंत त्यांनी आपल्या आंतेवासियांजवळ उद्‌गार काढले कीं, "अन्याय्य सत्तेचे तुकडे तुकडे करणें हें परमेश्वराची आज्ञा पाळणें होय." दिनांक १८ ऑगस्ट १९३६ ला मुंबईतील एका रुग्णालयांत रत्नागिरीला स्थानबद्ध असलेल्या वीर सावरकरांना भेटण्याची आशा मनाशीं धरून भारतीय स्वातंत्र्याच्या सशस्त्र संगरांतील ही तेजस्वी ज्योत शांत झाली.

●●●



*नमीच्या घरीं जाण्यासाठीं बेबी बाहेर पडते. काल सांगलीहून आणलेला नवा स्कर्ट घालायला ती विसरलेली नसते. स्कर्टच्या चुण्या व्यवस्थित पडलेल्या आहेत कीं नाहींत यासाठीं बेबीनें तीन-तीनदां मुरडून मुरडून पाहिलेलें असतें. ठसाठसा पावलें फेकींत दोन तीन रस्ते बेबी भराभर पार करते.*



सकाळचे साडेसात वाजून गेलेले असतात. आणि बेबी जागी झालेली असते. पडल्यापडल्याच वरती टांगलेल्या आक्काच्या आणि तिच्या नवऱ्याच्या फोटोकडे तिचें लक्ष जातें. बेबीला काय वाटते कुणास ठाऊक. पण लाथेनें पांघरूण उडवून ती ताठ उभी राहाते. पुरुषासारखा आळस देते आणि सपासपा न्हाणीघरांत जाऊन तोंड धुवून येते. आईनें दिलेला चहाचा कप बेबी हळुवार तोंडाला लावते. बराच वेळ रवंथ केल्यासारखा चहा पिते. तिच्या चहा पिण्याकडे तिची आई पहात रहाते. मग बेबी उठते. आरशापुढें उभी राहून केसावरून कंगवा फिरविते. पावडरचा पफ दोन चारदा उगीच्च तोंडावरून फिरवते. इतक्यांत तिला आपल्याला होमवर्क करावयाचें आहे हें आठवतें. जोगळेकर सरनी दहा गणितं सोडवून आणायला सांगितलेली असतात. गणितं सोडवायची या कल्पनेनंच बेबी कपाळाला आठ्या घालीत नाक वाकडं करते. कपाळाला आठ्या घालून किंचित नाक उडवून लावलं म्हणजे आपल्याला कसं शोभून दिसतं अशी उगीचच तिची कल्पना आहे. म्हणून ती पुन्हां आरशासमोर जाते. पुन्हां कपाळाला आठ्या घालून नाक चांगलं दोन इंच उडवते. आपल्यावरच खुष होत ती पुन्हां पुस्तकांच्या पिशवीकडे वळते. खुंटीवरची पिशवी घेऊन, सोप्यांत आंथरलेल्या सतरंजीवर बेबी फतकल मारते. भर-भरा पुस्तकं बाहेर काढते. पण चटकन तिच्या लक्षांत येतें की आपल्यांच्या नमीनं काल आपलं गणिताचं पुस्तक नेलेलं आहे. वास्तविक सकाळी लौकर आणून द्यायचं तिनं कबूल केलं होतं. पण नमीला रीतच नाहीं. आपला किती खोळंबा झाला—दुसऱ्यांची पुस्तकं न्यायची आणि ती वेळेवर परत करायला पाहिजेत अेवढी साधी अक्कलसुद्धां नसावी ?

नमीच्या घरीं जाण्यासाठीं बेबी बाहेर पडते. काल सांगलीहून आणलेला नवा स्कर्ट घालायला ती विसरलेली नसते. स्कर्टच्या चुण्या व्यवस्थित पडलेल्या आहेत कीं नाहींत यासाठीं बेबीनें तीनतीनदां मुरडून मुरडून पाहिलेलें असतें. ठसाठसा पावलं फेकीत दोन तीन रस्ते बेबी भराभर पार करते. एवढ्यांत नमीचें घर येतें. स्वतःकडे दोनदा पाहून झाल्यावर बेबी आंत शिरते. सोप्याला कोणच नसतें हे

पाहून बेबीची निराशा होते. ती तडक स्वयंपाक घरांत जाते. नमीची आई चुलीशीं कांहींतरी काम करीत असते-—

नमाच्या आई, नमा कुठाय ?

काय ग बेबी ? नमा आत्ताच गिरणींत डबा घेऊन गेली आहे दळणाचा—

दळणाच्या गिरणींत जाण्याच्या कल्पनेनेंच बेबी शहारते. दोन मिनिटं थांबलं तर तिथल्या पिठाच्या कणांनीं काय पण अवतार होतोय— शी :

आणि आतां ही नमी केव्हां यायची-आणि इथं बसायचं तरी कुठं ? खुर्च्या नाहींत, कॉट नाहीं, निदान सतरंजी-सुद्धां नाहीं बसायला. काय तरी माणसं, जमिनीवर नवा स्कर्ट घालून बसायचं तरी कसं ? पुन्हां अेकदां स्कर्टच्या चुण्यावरून बेबी हात फिरविते. नमीच्या आईनीं आपल्या स्कर्टबद्दल चौकशी करावी असं सारखं बेबीला वाटत असतं. पण त्यांचें लक्षहि बेबीकडे नसतें. घासलेले भांडे विसळत विसळत नमाच्या आई बेबीला विचारतात,

काय काम होतं ग बेबी ?

अहो, काल नमानं माझं गणिताचं पुस्तक आणलं होतं तें पाहिजे होतं मला–

घे तिच्या पिशवींतून, असं म्हणून नमाच्या आई पुन्हां कामाला लागतात. कोनाड्यांतली नमाची पिशवी काढून तिच्यांतलं आपलं गणिताचं पुस्तक बेबी घेते. पण अजूनहि आपल्या स्कर्टबद्दल नमाच्या आईनीं कांहींच विचारलेलं नसतं म्हणून पुस्तक घेऊन बेबी पुन्हां स्वयंपाकघरांत येते. कां ग, सापडलं नाहीं ? असं नमाच्या आई विचारतात. बेबी निराश होऊन सापडलं म्हणून सांगते. पुन्हां एकदां आपल्या फुगीर स्कर्टवरून हात फिरविते. तरीहि नमाच्या आई कांहींच बोलत नाहीत. म्हणून बेबीला राग येतो· नाहीतरी नमीची आई शिष्ठच आहे, असं मनांतल्या मनांत पुटपुटत बेबी बाहेर पडते. तरातरा घराकडे येते.

रागाच्या भरांत आपल्याला गणितं करायचीं आहेत हेही ती विसरून जाते. पण ते तिला जास्त वेळ विसरतां येत नाहीं. मग पुस्तकाची पिशवी बेबी दणकन् टेबलावर आदळते. गणिताचं पुस्तक काढतें. वही–पेन्सिल काढते. गणितं करायला लागते. पण पहिल्याच गणिताला तिचा गाडा अडतो. कांही केल्या तें गणित तिला सुटत नाही. मग ती दुसरं गणित सोडवायला लागते. त्याचेंहि उत्तर जमत नाहीं. तिसऱ्या गणिताचीहि हीच अवस्था झाल्यावर बेबी पुन्हा चिडते. गणितांत चुकीचीं उत्तरं छापलेली असावीत अशी तिला दाट शंका येते. म्हणून तिला गणिताच्या पुस्तकाचाच राग येतो. जोगळेकर सरांचाहि राग येतो. काय पण शिकवतात गणितं—अॅ हॅ हॅ हॅ—आणि पुन्हा लोकांना त्रास. नाहीतरी जोगळेकर सरहि शिष्ठच आहेत—आतां गणिताच्या तासाला काय करावं याची पंचाईत बेबीला कधीं पडतच नाही—

एवढ्यांत बेबीची आई बेबीला जेवायला बोलावते. बेबीचा राग अजून कायम असतो. पण जेवणाशीं त्या रागाचा कांहीच संबंध नसतो. म्हणून ती पानावर बसते. पण ती कांहींच बोलत नाही. आधीच फुगीर



असलेले तिचे गाल नव्या स्कर्टप्रमाणें जास्तच फुगलेले असतात. बेबीच्या आईना त्या फुगलेल्या गालाचेच कौतुक वाटतें. बेबीच्या आई कौतुकानें वाढत असतात. पण आज बेबी कौतुकानें जेवत नाही. कशीबशी जेऊन ती पानावरून उठते. पचापचा हात धुते. सुपारीच्या डबींतली खमंग सुपारी डाव्या दाढेंत सारते. आरशापुढें जाऊन केसा–वरून फणी फिरवते. कडेची केसाची एक बट मुद्दाम कपाळावर आणते. त्यासाठीं ती वीस मिनिटं घालवते. त्यानंतर तोंडाला स्नो लावते. पावडर थापते. थोडीशी पुसते. पुस्तकांची पिशवी घेते. सगळा जामानिमा नीट जमला आहे कीं नाही हें पुनः पुनः मुरडून मुरडून पाहाते आणि आईला न सांगताच शाळेला जायला बाहेर पडते—

कोपऱ्यावर भाव्यांची नलू भेटते. तिच्याशीं बोलायची बेबीची इच्छाच नाही. कारण ती कधींहि आपल्या स्कर्टची चौकशी करणार नाही याची बेबीला खात्री असते. मागे गोंड्याची नवी साडी नेसून आपण शाळेंत गेलो त्यावेळींसुद्धा नलीनं आपल्याला साडीबद्दल विचार-रलेलं नसतं याची बेबीला आठवण येते. शिष्ठ मेली—इतकं नाक नको आहे कांही फुगवायला. समजतं म्हटलं असलं वागणं. अंगावर धड पातळं नसतात आणि ऐट केवढी—

बेबी मुद्दामच छाती ताठ काढून नलूसमोरून ताडताड चालत जाते. नलूचें तिच्याकडे लक्षहि नसतें. याचाच बेबीला फार राग येतो. पण तो पाठीमागे पाहून नलीला दाखविण्याची तिला गरज वाटत नाहीं. ती तडक शाळा गांठते–शाळेंत मुली जमलेल्या असतात. कोळेकरांची पमीहि आलेली असते. अष्टकोनी तोंडाची पमी धांवतच बेबीकडे येते आणि तिला विचारते,

केव्हां ग शिवला हा नवा स्कर्ट ?

बेबीला आयुष्याचें सार्थक झाल्यासारखें वाटतें. नाहीतरी पमीच तिची जिवलग मैत्रीण असते. मागें मखमलीच्या पट्टयाचें चप्पल आणलेल्या वेळींहि पमीनेंच तिचें कौतुक केलेलें असतें. नवीन रिबिन जरी आपण आणली तरी तिची विचारपूस कर णारी पमी बेबीला फार फार जवळची वाटते. पमाने स्कर्टची चौकशी केल्यावर बाकीच्या

मधु कुलकर्णी



अनुक्रमणिका

## साक्ष



करिते जेव्हां धुंद कमलिनी
हितगुज जलिंच्या तरंगांसवें
गीत उमटते मनांत माझ्या
तुझिया हृदिंच्या सतारींतले ॥१॥

गंध वकुळिचा संग घेऊनी
थंड गारवा मनीं वहरतो
तरल तुझ्या त्या वटांभोवती
उगीच माझा जीव चिहरतो ॥ २ ॥

एक कोकिळा कुणी गातसे
रम्य दूरच्या वनराईत
आठवती अस्पष्ट शब्द मज
थरथरणारे तव ओठात ॥ ३ ॥

प्रतिबिंब हे पहा विलसते
संथ जलाच्या विशाल हृदयी
नीलनभाचें, जसे तरळते
बिंब ग माझ्या स्नेहल नयनी ॥ ४ ॥

ताठ उभे हे गुलाब सुंदर
गालांवरची लज्जा लेवुन
तुझ्या नयनिंच्या जलबिंदूनी
तृणहि वांकलें कमान घेउन ॥ ५ ॥

सडा सांडला मुग्ध फुलांचा
सुगंध धेऊन कुंतलांतला
फुंकर घालुन खट्याळ वारा
खुळेपणानें उगाच हसला ॥ ६ ॥

लवलवते गवताचें पातें
हळूंच झुकते, थबकुन वघते
सळसळतें अन् खुद्‌कन हसते
साक्ष तुझी मग मनी उमटते ॥ ७ ॥

— सुधीर सौर

साळकाया माळकाया सभोंवतीं जमलेल्या असतात. पण त्यांच्या नजरा कुत्सित आहेत असेंच बेबीला वाटत असते. तेवढ्यांतच सुमन पाटील म्हणते–

स्कर्टवरचं डिझाईन मला नाही बाई आवडलं. केवढं मोठं आहे तें! बेबीला असा संताप येतो. डिझाइन नाहीं म्हणे आवडलं. तुला काय करायचंय? तू कांही चार आणे घातलेले नाहीस नं त्यात? सुमीला मॅनर्सच नाहीत – चोमडी मेली–

प्रार्थनेची घंटा होते आणि सर्व मुलेंमुली प्रार्थनेला समोरच्या पटांगणांत जमतात. बेबी मुद्दाम सर्वांच्या पुढें उभी राहते. गंभीरपणानें प्रार्थना चालू होते. डोळे मिटून घेतल्यावर बेबीला वाटत राहतं हेड-मास्तरांच्यापासून सगळे आपल्या स्कर्टकडेच पहाताहेत. कित्ती कित्ती बरं वाटलं तिला या कल्पनेनं. म्हणूनच डोळे उघडून खरोखरच सगळ्यांच्या नजरा कुठं आहेत हें पाहण्याचं तिचं धाडस होत नाही,

पहिलाच तास गणिताचा असतो. तरीहि नव्या स्कर्टच्या नादांत तिच्या छातींत धडकी भरत नाही. जोगळेकर सर वर्गांत येऊन तास चालूहि झालेला असतो. पहिल्यांदाच जोगळेकर सर ओळीनें सगळ्यांच्या गणिताच्या वह्या पाहातात. पाहतां पातां ते नलूजवळ येतात नलूचीं सगळीं गणितं बरोबर आलेलीं असतात. जोगळेकर सर भर वर्गांत तिचें कौतुक करतात. बेबीला असा संताप येतो–पुरे झालं नाक फुगवयचं. फुटेल आतां नाक एखादेवेळीं फुगवून. शिष्ठ मेली–

जोगळेकर सर बेबीजवळ येतात. बेबी निर्लज्जपणानें, ऐटीत, नव्या स्कर्टचा घोळ सांवरीत उभी राहते–जोगळेकर सर म्हणतात–तुमचं काय, गणितांत भोपळाच असायचा–

वर्गांतलीं सगळीं मुलं केवढ्यांदा हंसतात ! त्यांतल्या त्यांत राम्या कुलकर्ण्यांचा आवाज सगळ्यांत ओळखून येतो. मवाली आहे मेला नुसता–कुठंहि वाटेंत भेटला कीं ' जहाज ' म्हणतो आपल्याला. हलकट मेला–बेबीचा संताप अनावर होतो. तिच्या चेहऱ्यावर गालच गाल दिसतात. रागाच्या भरांत जोगळेकर सर आणखी काय म्हणतायत याच्याकडे लक्ष द्यायला बेबीला वेळच नसतो. ती मटकन खालीं बसते–

आणि तास चालू होतो. बेबीचें कशांतच लक्ष लागत नाहीं. बाकी कुणी कां नसेना पण कोपऱ्यांत बसलेल्या अरविंद देशपांडेनें आपल्या स्कर्टकडे पहावें असें बेबीला वाटत असतें. नलीनं कांहीं फार नाक फुगवायचं कारण नाही. मघाशीं अरविंदाचीसुद्धां सगळीं गणितं बरोबर आली होती. नलीनं पार टाळकं आपटलं तरी अरविंद कांहीं पहिला नंबर तिला देणार नाहीं. तिथं कशी जिरते म्हणावं !–खरंच अरविंद किती छान दिसतो– त्यानं एकदा कां होईना आपल्या स्कर्टकडे पहावं–वास्तविक आपला स्कर्ट कसा छान झाला आहे. त्यावरचं बॅटस्‌मनचं डिझाईन कसं छान आहे. आणि तो शिवला आहे तरी कितो फिट्ट. डिझाइन कसं यावं तिथं बरोब्बर येतं. पांच मिनिटं बेबीचं शिंप्यावरच प्रेम बसतं. पण मग अरविंद आणि शिंपी यांच्या तुलनेनं ती मनांत घायाळ होते आणि पुनः पुन्हा अरविंदकडे पहात राहते......

नाकेला, सडसडीत अरविंद वर्गांत खालीं मान घालून बसलेला असतो. त्याची मान वर होत असते ती फक्त शिक्षकांकडे पहाण्या-साठीं. खरंच अरविंद किती सालस आहे– आणि काल वर्गांतल्या कार्ट्या त्याच्याबद्दल आणि नलीबद्दल कांहींतरी आचरटपणानं बोलत होत्या. फाजील मेल्या. आणि नलीला तरी कांहीं अक्कल आहे कां ? या वयांत असले थेर–लेटरानं बडवणारं कुणी घरांत आहेत कीं नाहींत ! –शिष्ठ मेली–

आणि बेबीचे पुढचे चार तासहि असेंच अरविंदकडे पाहण्यांत जातात. पण अरविंदचें तिच्याकडे लक्षहि नसतें. मग बेबी अरविंदवरहि चिडते. खूप चिडते.

मधल्या सुट्टीची घंटा होते. सगळ्या मुली मधल्या हॉलमध्यें जमतात. जेवणाचे लहान लहान डबे उघडतात. आज बेबीनं शिरा आणलेला असतो. ती मुद्दाम नलीच्या डब्याकडे पहात असते. तिच्या

अनुक्रमणिका

डब्यांत वाळलेली भाकरी असते. बेबी मुद्दाम पमीला विचारते, पमे, तुला शिरा हवा कां ग ? –सुमन पाटील खंवचटपणानें हसते. त्यामुळें बेबी इतकी संतापते कीं तिच्या वडलांच्या सामान्य नोकरीची टिंगल करते. सुमनहि मग गप्प बसत नाहीं. बेबीला ती हिणवते. कारकुनाची मुलगी म्हणते. त्यावर बेबीहि वसवसून टासून सांगते, कारकून नाहीं आहेत कांहीं आमचे दादा. आमचे दादा कोर्टांत क्लॉर्क आहेत. त्यावर सुमन पाटील छद्मीपणानें म्हणते क्लार्क ऑफ द कोर्ट नाहींत ना ? क्लार्क आफ द प्लीडरच नं ?–बेबीला असा संताप येतो. मला ठावूक आहे, हलकट नलीची फूस आहे म्हणूनच ही सुमडी असं बोलतेय. नाहींतर ती काय असं बोलतेय–म्हैस मेली–नलीचा तर तिला इतका राग येतो, कीं तिला वाटतं, नलीच्या नाकाला मोठ्ठं थोरलं करट व्हावं–शिष्ठ मेली—

या संतापाच्या भरांत पुढचे तास कसे जातात तेंच बेबीला कळत नाहीं. वर्गांतल्या सगळ्या कार्ट्यांचा, राम्या कुलकर्ण्यांचा आणि जोगळेकर सरांचासुद्धां तिला संताप येतो. सगळेच शिष्ठ मेले—

आणि या मनःस्थितींतच शाळा सुटल्यावंर बेबी घराकडे येत असतांना आपल्या नव्या स्कर्टच्या चिंध्या चिंध्या कराव्यात असा विचार करत असते. बेबी घरांत पोहोंचतें त्यावेळीं बेबीच्या आईनीं रेडिओवर ' सिलोन ' लावलेलें असतें. चौदहवी का चांद मधलें गाणें लागूनहि बेबी नेहमीप्रमाणें गाण्याच्या तालावर नाचत नाहीं. बेबीच्या आईना आश्चर्य वाटतें. बेबीला काय वाटतें कुणास ठावूक, ती एकदम आईवर खेकसते. त्याचेंहि बेबीच्या आई कौतुक करतात. तिच्या पाठीवर हात ठेवतात. बेबी पुन्हा खेंकसतें,

मला भूक लागली आहे जेवायला वाढ–

बेबीच्या भुकेचेंहि बेबीच्या आईना अपरूप वाटतें. मोठ्या कौतुकानें बेबीच्या आई बेबीला जेवायला वाढतात. बेबीचे गाल अजून तोंडभर भरून राहतात. बराच वेळ राहतात......

एवढ्यांत बेबीची धाकटी बहीण शेजारच्या कुटल्यातरी घरांत छत्री विसरून आलेली असते. रात्र होत आलेली असते. आतां छत्री कुठे पहायची. सकाळीं पाहू असें बेबीचे दादा म्हणतात. पण बेबीला दिवसभराचा सगळा राग उफाळून येतो. बेबी धाकट्या बहिणीच्या दंडाला धरून खेंकसून सांगते,

चल पाहूं या. कुणी लपवून ठेवली आहे ती—

बेबीची बहीण जिथें जिथें सकाळपासून गेलेली असते तिथें तिथें बेबी पाय वाजवत जाते. प्रत्येक ठिकाणीं छत्री इथंच असली पाहीजे असें ठासून सागते. कुणी, नाहीं आहे, असें म्हटलें तर तरातरा त्यांच्या स्वयंपाक घरांत जाऊन स्वतः छत्री शोधते– पुन्हा दुसऱ्या घरांतून पहिल्या घरात येऊन शोधते. आणि हें बेबीचें कर्तृत्व सर्व लोक गृहस्थधर्माला जागून नुसतें निवांतपणानें पहात रहातात आणि तरीहि बेबीला छत्री सापडत नाहीं—

शेवटीं बेबी मावशीच्या घरांत जाते. रात्रीचे नऊ वाजून गेलेले असतात. पण अंधारांतहि काळी छत्री चटकन् सांपडते. बेबीच्या समजस मावशी बेबीला विचारतात, अशा कशा ग तुम्ही उतावळ मुलो !

छत्री परत घेऊन घरीं जातांना इतर माणसांना सत्रीअपरात्रीं त्रास दिल्याबद्दल बेबीला कांहींही वाटत नाहीं–नाहीतरी शिष्ठच आहेत मेले सगळे—












# उर्दू कवींचें महाराष्ट्र प्रेम

*श्री सेतुमाधव पगडी यांचे उर्दूभाषेवरील प्रभुत्व असामान्य आहे. हें त्यांनीं वेगवेगळ्या प्रसंगीं लिहिलेल्या अनेक लेखांवरून सिद्ध झालेले आहे. आज या ठिकाणीं सुप्रसिद्ध कवि महरुम यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या एका कविता-संग्रहांतील कांहीं महत्वाच्या भागाचा त्यांनीं केलेला अनुवाद ऑगस्ट अंकाच्या निमित्ताने मुद्दाम देत आहेत......*

तिलोकचंद हे उर्दूतील सुप्रसिद्ध कवि आहेत. ते पश्चिम पंजाबचे राहाणारे. इ. स. १९४७ नंतर ते दिल्लीस येऊन स्थायिक झाले आहेत. कारवाने वतन या नांवाचा त्यांचा कविता संग्रह नुकताच प्रसिद्ध झाला आहे. या संग्रहांत त्यांच्या देशभक्तिपर कविता एकत्रित करण्यांत आल्या आहेत. तिलोकचंदांचें कवितेंतील नांव महरूम म्हणजे वंचित हें होय. इ. स. १९०६ पासून त्यांनीं काव्य रचनेस सुरवात केली. गोपालकृष्ण गोखले आणि टिळक यांच्यावरील तिलोकचंदांच्या कविता खाली दिल्या आहेत.

[ १ ]

### टिळक आणि गोखले

खुर्शीद और क़मर हैं तिलक और गोखले
भारत मे जल्वागर हैं तिलक और गोखले ॥१॥

टिळक आणि गोखले म्हणजे सूर्य आणि चंद्र होत. भारतांत टिळक आणि गोखले हे प्रामुख्यानें तळपत आहेत.

सोज़े वतन है दोनोंमे क्या बहसे नरम व गरम
इक आग के शरर हैं तिलक और गोखले ॥२॥

मवाळ आणि जहाल यांचा वाद. दोघांच्याहि हृदयांत देशाविषयी तळमळ आहे. टिळक आणि गोखले हे म्हणजे एकाच अग्नीच्या ठिणग्या होत.

फर्जंद यूं तो मादरे भारत के बेशुमार
दो पाराये जिगर हैं तिलक और गोखले ॥३॥

भारताचे असंख्य सुपुत्र आहेत पण टिळक आणि गोखले हे म्हणजे भारतमातेच्या जिवाचे कलिजे होत.

दोनों की धूम बीशाये हुब्बे वतन मे है
वल्लाह शेरेनर हैं तिलक और गोखले ॥४॥

देशभक्तीच्या क्षेत्रांत दोघेही प्रसिद्ध आहेत. टिळक आणि गोखले हे दोघेही नरव्याघ्र होत.

[ २ ]

### गोपाल कृष्ण गोखले यांच्या मृत्यूवर

मांग रहा था गैबसे जिस की बका तमाम हिंद
सोग मे आज उसके है बज़्मे अज़ा तमाम हिंद ॥ १ ॥

सगळा भारत तुला जीवन लाभावें म्हणून परमेश्वरापाशी प्रार्थना करीत होता. हाय, आज तुझ्या मृत्यूमुळें सगळा देश म्हणजे एक शोकसभा बनली आहे.

बख्त की नारसाईसे चर्ख की कज अदाई से
हो गयी आहे नारसा, तेरी दुआ तमाम हिंद ॥ २ ॥

हे भारता, दुर्दैवामुळें आणि काळाच्या विपरीत गतीमुळें, तुझ्या प्रार्थना निष्फळ ठरल्या.

फ़ख्रे जमाना कौनसा आज जहांसे चल दिया
वक्फे अलम है इक जहां, महवे बुका तमाम हिंद ॥ ३ ॥

या युगानें ज्याचा अभिमान बाळगावा असा महापुरुष या जगांतून निघून गेला. सारे जग शोकग्रस्त झालें आहे. सगळा भारत अश्रू ढाळीत आहे.

मादरे हिंद का सपूत, तेरे ग़मे फ़िराक़ मे
आज है दाग खुर्दाये सोज़े फना तमाम हिंद ॥ ४ ॥

भारतमातेच्या सुपुत्रा, तुझ्या विरहदुःखामुळें साऱ्या भारताच्या हृदयावर दुःखाग्नीचे व्रण खोल उमटले आहेत.

तेरी जिगर फिगारियां याद रहेंगी इन्शतक
याद करेगा फ़ख्रसे तुझ को तेरा तमाम हिंद ॥ ५ ॥

तू सहन केलेले कष्ट आणि केलेला त्याग ही कल्पांतापर्यंत आम्हाला आठवतील. सगळा भारत मोठ्या अभिमानानें तुझी आठवण करील.

हिंद के जो फिदाई हों वो न जियें हजार हैफ़
वक्तसे पहले चल बसें, गर्दिशे रोजगार हैफ़ ॥ ६ ॥

भारताचे भक्त, आणि त्यांना मृत्यु यावा, हजार अफसोस. त्यांना

अकाली मृत्यु यावा हे केवढें दुर्दैव होय.

मगें उम्मीदे हिंद है, तेरी वफात गोखले
जिंदगीये उम्मीद थी तेरी हयात गोखले ॥ ७ ॥

गोखले, तुमचा मृत्यु म्हणजे भारताच्या आशांचा मृत्यु होय. गोखले, तुमचें अस्तित्व म्हणजेच आमचे आशादायी जीवन होय.

हुब्बे वतन का आइ तू नय्यरे ताबनाक था
फिर वही गम नसीब मे, फिर वही रात गोखले ॥ ८ ॥

तुम्ही म्हणजे देशभक्तीच्या गगनांतील तळपणारा सूर्यच. आतां तुम्ही गेलांत, आमच्या नशिबांत फिरून शोक आणि फिरून रात्र ही आली आहेत.

इस्तिकलाल वो तिरा, शाने मुदब्बरी तिरी
लायेंगे अब कहांसे हम, नेकसिफात गोखले ॥ ९ ॥

तुमचा निर्धार आणि तुमची मुत्सद्देगिरी, हे गुण, गोखले, आम्ही पुन्हां कोठून आणावे.

गर्मे सफर था कारवां, और वो मीरे कारवां
राह मे आह पडगया मौत के हात गोखले ॥ १० ॥

भारताची यात्रा चालू होती आणि गोखले हे मार्गदर्शक होते. पण हाय, वाटेंतच ते मृत्यूच्या तावडींत सांपडले.

हम को भी रास्ता कोई तुझको दिखाके जाना था
कते रहे अदम तो थी बात की बात गोखले ॥११॥

आमचें मार्गदर्शन करून, गोखले, तुम्ही जाण्यास हवे होते. मृत्यूला तुम्हाला टाळून लाविता आलें असतें.

होगा वतन पे आह अब तेरी तरह निसार कौन
तूही नहीं तो हिंद का बेडा करेगा पार कौन ॥१२॥

गोखले, तुमच्याप्रमाणें देशाकरितां सर्वस्वावर पाणी सोडणारा यापुढें कोण राहील? हाय, तुम्ही राहिला नाही, आतां भारताची नौका पैलतीराला कोण नेऊन सोडील?

[ ३ ]

## यादे तिलक

टिळकांच्या मृत्यूनंतर पहिल्या वर्षदिनानिमित्त

हो गया तुझ को सिधारे एक साल
जानिबे फिर्दौस, अय गमख्वारे हिंद ॥१॥
इक बरससे रोरहा है सैल सैल
तेरे गम मे दीदाये खूंबारे हिंद ॥२॥

स्वर्गाप्रत गमन करून तुला एक वर्ष झालें. तुझी आठवण करून गेले वर्षभर भारताच्या डोळ्यांतून रक्ताश्रूंची सारखी झड लागली आहे.

हाय वो रोजे सियाह, जब होगयी
शामे हिर्मा सुबहे पुर अन्वारे हिंद ॥३॥
कारवां को छोडकर तू चल दिया
दश्त मे अय कारवां सालारे हिंद ॥४॥

हा तो दुर्दिन, तुझ्या मृत्यूनें भारताच्या उज्ज्वल दिवसाचे शोक रात्रींत रूपांतर झालें.

भारताला वैराण वाळवंटांत सोडून, हे सेनापते, तू निघून गेलास.

रायते उम्मीद झुककर रह गया
हुरीयत के अय अलम बर्दारे हिंद ॥ ५ ॥

भारताच्यां स्वातंत्र्याचा ध्वज हातात धारण करणाऱ्या महापुरुषा, तुझ्या मृत्यूनें आमच्या आशांचे भाले खाली वांकले.

अय् तिलक, अय् यूसुफे मिस्रे वतन
बाईसे सद गर्मीये बाजारे हिंद ॥ ६ ॥
कैद होकर जौके आजादी दिया
हिंद को अय् सरवरे अहरारे हिंद ॥ ७ ॥

मिस्र देशांत यूसुफमुळें जशी खळबळ उडाली तशीच तुझ्यामुळें भारतांत जागृतीची लाट पसरली. हे स्वातंत्र्य वीराग्रणे, तू बंधनांत पडलास पण भारतांत तूं स्वातंत्र्यप्रेम निर्माण केलेस.

फ़ैजे शामिलसे तेरे आया नज़र
इख्तितामे दौराये इदबारे हिंद ॥ ८ ॥
मुंतज़र जिस दिन के थे वो है करीब
कोयी दिन मे दूर है आजारे हिंद ॥ ९ ॥

तुझ्या कृपेमुळें आमच्या दुर्दशेचे दिवस संपत आले होते. ज्या दिवसाची आम्हीं वाट पाहात होतो, आमचे कष्ट संपण्याचा तो दिवस जवळ येत आहे.

[ ४ ]

## तिलक महाराज की याद मे

( ही कविता इ. स. १९२२ ची आहे )

नस्लें हमारे बाद जो आयेंगीं हिंद मे
आजाद, बा मुराद, जवांबख्त, शादकाम ॥ १ ॥
खुददार, हक़परस्त गय्यूर, और अर्जमंद
जानेबाज, सरबलंद, जरी, साहबे इहतिशाम ॥ २ ॥

आमच्यानंतर भारतांत येणाऱ्या पिढ्या, स्वाभिमानी, स्वतंत्र, सुदैवी, यशस्वी, सत्यनिष्ठ, प्रतिष्ठित, उंच मान करून चालणाऱ्या, शूर आणि वैभवशाली अशाच राहातील.

तारीखे अहदे कुहना पे डालेंगी जब नज़र
जिस अहद मे अभी समरे हुरियत था खाम ॥ ३ ॥
वो अहद जिसमे उनके बुजुर्गाने रफ्ता को
खौफ़े तफंगो तीरसे रहना पडा गुलाम ॥ ४ ॥

आमचे वंशज भूतकाळाचा इतिहास वाचतील त्यावेळी स्वातंत्र्याचें फळ अद्याप कचें होतें. त्या काळांत लोकांना शत्रूच्या शस्त्रबळाच्या भीतीनें दास्यांत जीवन कंठणें भाग पडत होतें.

उन्वाने सुर्ख से जब नजर आयेगा उन्हें
दौराने अमन व अदल मे डायर का करले आम ॥ ५ ॥
बाजारे कैद व बंदकी गर्मी का माजरा
हर गाम पर ज़बान व क़लम की वो रोक थाम ॥ ६ ॥
उबलेगा उन का खूने हमीयत दिलों मे खूब
और जोशे दिलसे आयेगा लबपर तिलक का नाम ॥ ७ ॥

त्या शांततेच्या आणि न्यायाच्या (!) युगांत डायरने केलेल्या कत्तलीची हकीकत ठळकपणें लिहिलेली त्यांना आढळेल. धरपकडी आणि तुरुंगवास त्या काळी घडत. पदोपदी भाषणबंदी आणि लेखनबंदी केलेली आढळून येई. येणारी पिढी या गतकाळांतील घटनांवर विचार करील त्यावेळी तिला विलक्षण क्षोभ होईल.








त्यांचें रक्त सळसळूं लागेल. त्यावेळी त्यांच्या ओठावर नांव येईल तें टिळकांचें होय.

बैठेंगे जब के याराने जिंदा दिल
गर्दिश मे आयेगा मये हुब्बेवतनका जाम ॥ ८ ॥
या रफे दुश्मनाने वतन के लिये कभी
जायेंगे लेके रज्म मे जब तेगे बेनियाम ॥ ९ ॥
बा सद हजार जोशे अक़ीदत, खुलूसें दिल
उनकी ज़बांपर आयेगा पहले तिलक का नाम ॥१०॥

सहृदयांच्या बैठकींत देशभक्तीच्या मदिरेची पात्रें फिरतील (देशभक्तीची चर्चा होईल) किंवा देशाच्या शत्रूंशी लढण्यासाठीं योद्धे आपल्या तलवारी म्यानांतून बाहेर काढून रणांगणांत उतरतील त्यावेळीं लाखो निष्ठांनी युक्त आणि भक्तिभावानें भरलेले असें एक नांव प्रथम त्यांच्या ओठवर येईल आणि तें म्हणजे टिळकांचें होय.

फिरता है इक समां मिरी नजरोंनके सामने
नौरोजे हुरीयत का वो है इहतिमाम ॥११॥
पीरो जवान व तिफ्ल हैं क्या क्या शिगुफ़्तार
है फ़ेज़े मुर्खरूयी से हर एक लाला फ़ाम ॥१२॥
हर सू हैं शादियाने मसरत के बज रहे
हर एक सिम्त जश्न की बरपा है धूमधाम ॥१३॥
लहरा रहा है परचमे इक्बाले मुल्के हिंद
झुक झुक के कर रहा है जिसे आसमां सलाम ॥१४॥
और देखिये ज़रा सरे पर्चम फ़जा मे क्या
ज़र्री हुरूफ़मे है चमकता तिलक का नाम ॥१५॥

माझ्या डोळ्यासमोर भविष्यांतील एक दृश्य दिसत आहे. आपला देश स्वतंत्र झाला आहे. स्वातंत्र्योत्सवाची तयारी झाली आहे. आबालवृद्ध सगळे प्रसन्न दिसत आहेत. यशःप्राप्तीमुळे प्रत्येकजण पुष्पाप्रमाणे प्रफुल्लित आहे. दिशादिशांतून आनंदाचे चौघडे झडत आहेत. जिकडे तिकडे उत्सवाची एकच धामधूम चालू आहे. भारताचा भाग्यध्वज मोठ्या डौलानें फडकत आहे. प्रत्यक्ष आकाशही वांकून वांकून ध्वजाला प्रणाम करीत आहे. पहा त्या ध्वजावर काय दिसत आहे तें. सुवर्णाक्षरांनीं लिहिलेलें टिळकांचें नांव त्या ध्वजावर आहे.

[ ५ ]

**जिंदा जावीद (चिरंजीव)**

तिलक महाराज की याद में

जहां मे सरफरोशोंकी है बाकी दासतां जबतक
कबी उस दासतां से है दिले अहले जहां जबतक ॥ १ ॥
तळहातावर शिर घेऊन झगडणाऱ्या वीरांच्या कथा जोपर्यंत जगांत प्रचलित राहतील आणि या कथांमुळें लोकांना जोपर्यंत स्फूर्तीचा आणि निर्धाराचा लाभ होत राहील

गुलामी और आज़ादीमे जब तक जंग जारी है
और उसके बाद आजादीका लहराये निशां जबतक ॥ २ ॥
स्वातंत्र्याचा लढा जोपर्यंत चालू राहील आणि त्यानंतर स्वातंत्र्याचा ध्वज जोपर्यंत फडकत राहील.

क़फ़स मे रहनेवालों के दिले मुज्तर को तडपाये
बहारे सब्जा व गुल्शन मे यादे आशियां जबतक ॥ ३ ॥
कैदेंत सांपडलेल्या पक्ष्यांना, वसंतऋतूंत, उपवनांतील आपल्या घरट्याच्या आठवणीनें जोपर्यंत व्यथा वाटत राहील (गुलाम राष्ट्रांना जोंपर्यंत आपल्या गतस्वातंत्र्याच्या कल्पनेनें क्षोभ वाटत राहील)

दिले अहरार को जबतक जफ़ा है बाइसे नफ़रत
वफ़ा बाक़ी है जबतक और वफ़ा का इम्तिहां जबतक ॥ ४ ॥
स्वातंत्र्यवीरांना राजकर्त्यांच्या जुलुमाबद्दल जोपर्यंत छळ वाटत राहील, जगांत जोवर निष्ठा शिल्लक आहे आणि जोवर निष्ठेच्या कसोटीचे क्षण येत राहातील.

है जबतक मायाये फ़ख्रे मिलल आयीने खुद्दारी
पये अक़्वाम है दूं हिम्मती ज़िल्लते निशां जबतक ॥ ५ ॥
जोपर्यंत स्वाभिमान हेंच राष्ट्राचें अमूल्य भांडवल समजलें जाईल आणि भित्रेपणा ही राष्ट्राची नामुष्की होय असें लोक समजतील.

दिलोंमे जब तलक है जज्बाये हुब्बे वतन बाक़ी
लहू मे उससे हो जाती हैं पैदा गर्मियां जबतक ॥ ६ ॥
देशप्रेमाची भावना जोंपर्यंत जगांत शिल्लक आहे आणि त्यामुळें जोपर्यंत रक्त सळसळत राहील.

मुहिब्बाने वतन के कारनामे बज्मे आलम मे
सरापा जोशे दिल होकर रहें वक्फ़े बयां जबतक ॥ ७ ॥
देशभक्तांच्या कथा जगांत जोपर्यंत गाजत राहतील आणि त्या स्फूर्तिदायक कथांची चर्चा लोक जोपर्यंत करीत राहतील.

रहेगा दहर मे ज़िक्रे गिरामी अय् तिलक तेरा
के मर सकता नहीं है नामे नामी अय् तिलक तेरा ॥ ८ ॥
तोंपर्यंत हे टिळक, तुमच्या चरित्राचा उल्लेख होत राहील. तुमचे नांव अमर राहील.

●●●












मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






# एक पानी कथा

## लावण्य

७ जानेवारी १३५५ सालची ती एक प्रसन्न प्रभात होती.

पोर्तुगालचा तत्कालिन पातशहा चौथा दी. आफ्रोंस, नाभीकमलापर्यंत रुळणारी आपली दाढी कुरवाळीत-कुरवाळीत एका प्रशस्त दालनांत सतत् येरझारा घालीत होता. त्याच्या एकंदरीत हालचालीवरून कसल्यातरी विमनस्क परिस्थितींत तो अडकून पडला आहे, असें सहज अनुमान करता येई. इतक्यांत सजवलेला एक दर्जेदार वारु राजासमोर येऊन उभा ठाकला. राजानें त्यावर निमूटपणें टांग टाकली. आणि कोइंब्र (Coissbra) नगरीच्या दिशेने तो वाटचाल करूं लागला. त्याच्या मागून जमलेली सारी मंडळीहि चालूं लागली.

हा सगळा समुदाय सावकाशपणें मार्ग क्रमीत होता. त्यांतील चार असामी मात्र आपल्या अवसानानें पावलें टाकीत होते. ते राजसल्लागार होते तसेच इनेजची इतीश्री घडवून आणणाऱ्या गटाचे प्रमुख होते. इनेजच्या होऊं घातलेल्या हत्येनें राजाच्या हृदयाचा कानाकोपरा व्यापून टाकला होता. तिच्या वधाचा वटहुकूम राजाच्या हातूनच सुटला होता आणि हा वध सगळ्यांत कोणाच्या जिव्हारी लागला असेल, तर तो खुद्द राजाच्याच. कारण, त्याला वाटे, इनेज अगदी निरपराधी आहे. केवळ राजकीय कारणामुळें आपण हें पाप पदरीं पाडून घेत आहोत. त्याला असेंहि वाटे की, इनेजची न्यायालयीन चौकशी ही न्यायदेवतेची एक निष्टुर चेष्टा आहे, कारण, इनेजला असामान्य लावण्याची प्राप्ति झालेली आहे, यांत तिचा बिचारीचा कोणता दोष? न्यायालयीन निवाड्यावर स्वाक्षरी देऊन आपण चूक केली. अशी राजाची खात्री झाली!

कोइंब्र शहरांतल्या सान्ताक्लारा राजवाड्या समोर स्त्रीपुरुषांनी गर्दी केली. याच वाड्यांत पेद्रूची प्रियतमा, ती अभागी इनेज, आपल्या तीन मुलांसह रहात असे. पेद्रूची तिच्यावर अपार प्रीति होती. तो तिला क्षणभर देखील विसंबत नसे. विसंबत असे फक्त शिकारीला अरण्यांत जाई तेव्हा. मृगया हा पराकोटीला गेलेला पेद्रूचा एक छंद होता! आज असाच तो मृगयेला निघून गेला होता आणि याच कारणामुळें आजच्या आज इनेजचे शिर धडापासून वेगळें करण्याचा कट रचण्यांत आला होता. सल्लागारांनी आपापसांत मसलत करून इनेजवरील आरोपपत्र अगोदरच तयार करुन ठेवलें होतें. वाड्यांत घुसून त्या पत्राचें नाममात्र वाचन करणे व इनेजवर शस्त्र चालवणे एवढाच कार्यभाग शिल्लक राहिला होता.

आपला सासरा आफोंसराजा न्यायालयीन नोकर वर्ग व धर्मगुरु, हे सगळे एकसमयावच्छेदेकरून शाहीवाड्यांत शिरलेले पाहून इनेज भयचकित होऊन गेली. तिला या प्रकाराचा कांहींच अर्थबोध होईना. तिला काय करावें कांहींच सुचेना. ती धांवून सासऱ्यापाशीं गेली. आणि बहुमानदर्शक असे सासऱ्याच्या सव्यहस्ताचे तिनें चुंबन घेतले व "हा काय बनाव आहे?" असा खुणेने त्याला सवाल केला. आफोंसला जबाब सुचेना. त्याची जिव्हा जड झाली.

आपली स्नुषा कोंस्तांसराणी हिच्याबरोबर इनेजचा राजकुटुंबांत कसा प्रवेश झाला, तिच्या लावण्यावर आपला पुत्र पेद्रु कसा मोहित झाला, पेद्रु व दरबारचे सल्लागार यांच्यात ह्या प्रकरणी उडालेले खटके, पेद्रुचा खट्याळ खोडकर पण निष्कपटी स्वभाव. त्याच्या पूर्वीच्या दोन बायकांचे अपमृत्यू. वार्धक्यामुळें निर्माण झालेली स्वतःची असहाय्यता, आपल्या मागून पेद्रुला गादीचा मिळणारा वारसा व वारसानंतर इनेजच्या संततीला राज्यपद प्राप्त होईल तर पोर्तुगीज पातशाहीवर ओढवणारी घोर आपत्ति आणि ही आपत्ति थोपवून धरण्याकरितां इनेजचा कांटा काढून टाकण्याचा हा बनाव. घटनांचा हा लांबलचक पट आफोंन्सच्या डोळ्यासमोर तरळून येतो.

अखेर राजानें इनेजला देहान्ताची सजा फर्माविली. ती कानावर पडल्यावर, व्याघ्र मुखांत सांपडलेल्या हरिणशावकानें फोडावा, तसा टाहो इनेजने फोडला! आफोंसच्या पायांवर तिने अक्षरशः लोळण घेतली आणि असली भयंकर शिक्षा देण्यासारखा कोणता घोर अपराध आपल्या हातून घडला, असा प्रश्न केला. आफोंस काय उत्तर देणार? तुमच्या या गरीब नातवंडाकडे पाहून तरी मला जीवदान द्या' अशी तिने आफोंसची विनवणी केली. आफोंसचें अंतःकरण विरघळलें. भावनेच्या भरांत तो मोठ्यानें उद्गारला. 'इनेज निरपराधी आहे. हत्या थांबवा!'

परंतु, इनेजच्या जीवावर उठलेल्यांना हे शब्द कसे रुचावे! ते त्यांना शल्यासारखे झोंबले. त्यांनीं एकच गिल्ला चालू केला. 'शक्य नाही, राजा, शक्य नाही ही गोष्ट.' 'स्वतःचा निवाडा स्वतःच धाब्यावर बसवतोस कीं काय! एका यःकश्चित स्त्रीपायीं सबंध देश धोक्यांत घालणार! न्यायदेवतेचा धडधडीत उपमर्द आहे हा! असला उपमर्द देश सहन करणार नाहीं. हुकुमाची तामिळी झालीच पाहिजे.'

राजा हतबुद्धच झाला. 'होऊं द्या तर मग अंमलबजावणी' असे कांहीसे शब्द त्यानें कसेबसे उच्चारले व त्याच पावलीं अश्वारूढ होऊन तो निघून गेला.

पडल्या फळाची का होईना, राजाज्ञा मिळाल्यावर अंमलबजावणीला कितीसा उशीर, पूर्वनियोजित शस्त्रधारी दूतांनी क्षणार्धात इनेजच्या तनुलतेवर झडप घातली.

इनेजचा पार्थिव देह जवळच असलेली तिची पोरकीं मुले, धरणीचा काही भाग आणि सभोंवारच्या भिंती, रक्तानें न्हाऊन निघाल्या होत्या. मुले भीतीनें गांगरुन गेलीं होतीं. दासदासींनी नेत्र मिटले होते. पिंजऱ्यांतील राघूमैनांनी पंख झांकून घेतले होते आणि जिकडे तिकडे नीरव शांतता पसरली होती.

सूर्य अस्ताचलाला जात होता, व सायंकालिन लौकिक व्यवहार सुरळीत चालू होते. स्त्रीलावण्यांत जसा अर्थ, तसाच अनर्थही कसा साठलेला असतो' हा अनुभव विचारवंत घेत होते.

—के. ना. बर्वे



अनुक्रमणिका









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





१४ ऑगस्ट १९६२ रोजीं मुंबई हायकोर्टाला शंभर वर्षे पूर्ण होत आहेत. व्यक्तीला किंवा संस्थेला शंभर वर्षांची जीवनधारा लाभणें हा अभिनंदनीय योग आहे. आयुष्याच्या रंगणांत शतक काढणाऱ्या व्यक्तीची शंभर वर्षे भरलीं असें आपण म्हणतों, पण संस्थेच्या बाबतींत मात्र हें दीर्घायु संस्थेच्या भावी भाग्यकालाचें सुचिन्ह होय असेंच आपण मानतों.



# तेजस्वी न्यायपरंपरेची शतसंवत्सरी—

वन्दे तां तुलाकराम्
मनोमन्दिरवासिनीम्
न्यायदेवीं सदयां
मीलिताक्षीमीशकलाम्॥

मुंबई हायकोर्टाचा जन्मदिन कोणत्याहि प्रकारच्या समारंभाचा सोहळा किंवा मिरवणुकीची मौज न करतां अत्यंत धीरगंभीर वातावरणांत पार पडला. हायकोर्टापूर्वी मुंबईत सुप्रीम कोर्ट ही न्यायसंस्था होती. १४–८–१८६२ रोजीं त्या संस्थेच्या पांच न्यायमूर्तीनीच आपण हायकोर्टाचे न्यायाधीश म्हणून काम करूं अशी जाहीर घोषणा वकील व जनता यांचेसमोर केली. ही घटना अपोला स्ट्रीटवरील हार्न्बी हाऊसमध्यें मुंबईचे गव्हर्नर सर हेन्री फ्रियर यांचे समक्ष घडली. सर मॅथ्यु सॉस हे पहिले सरन्यायाधीश होत.

एप्रिल १९६२ मध्यें हायकोर्टाची शताब्दी थाटामाटांत पार पडली. १९१२ सालीं सुवर्ण-महोत्सव झाला. त्यावेळीं चीफ जस्टीस न्या. स्कॉट यांनी सर्व न्यायाधीश व वकिलांना चहापार्टी दिली होती.

मुंबईतील इंग्रज–प्रणीत न्यायदान पद्धती गेलीं २९२ वर्षें कार्यवाहीत आहे. हायकोर्टाच्या स्थापनेपूर्वी १९२ वर्षांच्या कालखंडांत पांच प्रकारची निरनिराळीं कोर्टें एकामागून एक मुंबईत न्यायदान करीत होती. म्हणून या हायकोर्टपूर्व न्यायदानाचे पांच काल खंड पाडता येतात.

रोम हें सात टेकड्यावर वसलेलें प्राचीन शहर आहे, तर मुंबई हें सात बेटांवर आधारलेलें एक अर्वाचीन शहर होय. १६६१ मध्यें इंग्लंडच्या राजाला विवाह–भेट म्हणून मिळालेली मुंबई म्हणजे एक सुमार मच्छीमार खेडें होतें; हल्लीच्या सातपाटीसारखें. असें म्हणतात कीं त्यावेळीं मुंबईत न्याय मिळत नसे तर फक्त मासेच मिळत. मात्स्यन्यायाचा काळ होता तो. मोठा मासा छोट्या माशावर जगे. बळी तो कानपिळी अशी परिस्थिती होती.

दुसऱ्या चार्लस् राजानें ३–४–१८६१ रोजीं ईस्ट इंडिया कंपनीला ब्रिटीश कायदे कंपनीव्यास भारतीय भूभागाला लागू करावेत अशी सनद दिली. सुमारें तीन शतकांपूर्वी ब्रिटीश न्यायपद्धतीचें बीज भरतभूमींत पेरलें गेलें. त्या अणुबीजाचा आज अक्षय्य विराट वटवृक्ष आपणास पहायला मिळत आहे.

कांहीं दिवस सासूचे तर कांहीं सुनेचे हेंच खरें. १६७० पर्यंत मुंबईद्वीपातील खटले ठाणें किंवा वसई येथील वरिष्ठ कोर्टांत चालत. पण २ फेब्रुवारी १६७० रोजीं किरकोळ कामें चालविण्यासाठीं दोन कोर्टें मुंबई व माहीम येथील कस्टम हाऊसमध्यें बसूं लागली. नंतर प्रांतातील सर्वश्रेष्ठ कोर्ट मुंबईस आलें व मुंबईकरांना आपखुषीनें ठाण्यास जाण्याचें कारण उरलें नाहीं.

सिंहाप्रमाणें निर्भय स्वातंत्र्य, सरकारशीं मिंधेपणानें न वागणें हें ब्रिटीश न्यायदान-पद्धतीचें असामान्य वैशिष्ट्य होय. अशा प्रकारचें पहिलें न्यायकोर्ट १६७२ मध्यें मुंबईत गव्हर्नर 'ॲंग्यार' यांनीं स्थापन केलें. ज्युरीची पद्धत चालू झाली. न्या. निकोल व गॅरी या ॲंग्यार कोर्टाचे न्यायमूर्तिद्वयानें भारतांतील न्यायदान–स्वातंत्र्याचा पाया घातला असें म्हणतात.

या ॲंग्यार–नियुक्त कोर्टानंतर १७२७ सालीं मेयर कोर्टाची स्थापना झाली. त्यांत सर्व दिवाणी कामें चालत. फौजदारी कामें ओयर व टर्मीनर या कोर्टाकडे असत. श्री. ड्रेपर हे पहिले मेयर होत. त्यांचे मदतनीस नऊ ऑल्डरमेन असत, मेयरना सालीना पांचशें

रुपये तनखा मिळे. तर ऑल्डरमेनना फक्त १२ ते १४ रुपये मासिक पालखी–भत्ता मिळे. या ऑल्डरमेनांचे लाल-काळे झगे पन्नास वर्षांत बदलले नाहींत म्हणे. कदाचित् झगा–भत्ता मिळत नसल्याने जुनें तें सोनें समजून तो पुरातन पोषाख ऑल्डरमेन वापरीत असावेत. मात्र गाऊनच्या जीर्णतेमुळें न्यायसंस्थेच्या वातावरणाला एक अनोखा रुबाब प्राप्त होतो असें अजूनहि मानलें जातें म्हणा. न्यायदे–वतेच्या मंदिरांत भाविकतेला वाव कां नसावा ?

१७९७ मध्यें मेयर कोर्ट व ओयर टर्मीनर कोर्ट बरखास्त करण्यांत येऊन तेथें रेकॉर्डर कोर्ट स्थापलें गेलें. सर वुइल्यम सेयर हे आद्य रेकॉर्डर होते. या कोर्टांत दिवाणी व फौजदारी कोर्टांचें एकीकरण करण्यांत आलें.

रेकॉर्डर कोर्टाच्या ऐवजीं १८२३ सालीं सुप्रीम कोर्टाची प्राणप्रतिष्ठा करण्यांत आली. या कोर्टाचे ४ न्यायाधीश असत. कोर्टाची अधिकार–कक्षा दिवाणी, फौजदारी व समंदरी क्षेत्रांत जारी होती, पण फक्त मुंबई बेटा-पुरतीच ! दोन वर्षांनीं सदर दिवाणी अदालत व सदर फौजदारी अदालत हीं अपील कोर्टें सुरतेहून मुंबईस आणण्यांत आली. १८६१ च्या इंडियन हायकोर्टस् ॲक्टान्वयें लेटर्स पेटंट-द्वारा सुप्रीम कोर्ट व सदरीस दोन सदर कोर्टें यांचें एकीकरण करून एक हायकोर्ट स्थापावें अशी तरतूद करण्यांत आली व पुढील वर्षी हायकोर्टाची मुहूर्तमेढ रोवण्यांत आली.

आद्य हायकोर्टाचे सुरवातीला सात न्याया-धीश होते. त्यापैकीं तिसरा हिस्सा इंग्लंडचे बॅरिष्टर होते व आणखी तिसरा हिस्सा सनदी नोकरींतील न्यायमूर्ति होते. कनिष्ठ कोर्टांवर पर्यवेक्षण करण्याचा अधिकार हायकोर्टास देण्यांत आला व कनिष्ठ कोर्टांचे निकाला-विरुद्ध अपील, फेरतपासणी अर्ज वगैरे ऐक-ण्याचा अधिकारहि प्राप्त झाला.

मुंबईतील विविधनामी कोर्टांच्या जागा निरनिराळया वेळीं बदलत गेल्या, पण न्यायाचा स्वतंत्र बाणा व धारवाडी कांटा मात्र सदैव अढळ राहिला. बिबळ्या वाघ आपलीं निवासस्थानें (Spots) बदलतो पण अंगावरचे ठिपके (Spots) मात्र बदलत नाहींत. तशांतलाच प्रकार आहे हा. ॲग्यारची कोर्टें कस्टम हाऊसमध्यें भरत. मौज म्हणजे त्याच इमारतींत धान्याचें कोठार व कारागृह असे. 'श्वा, युवा, मघवा' यांना एकाच दावणींत बांधणाऱ्या पाणिनीला हा सवाई पाणिनी भेटला खास ! हें घर म्हणजे फोर्टमधील गनबो स्ट्रीट व बोरा बझार स्ट्रीट नाक्यावरील मोपल्याचा पोळ होय. मेयर कोर्ट टाऊन हॉल शेजारील कस्टम हाऊसमध्यें भरे, तर रेकॉर्ड कोर्ट व सुप्रीम कोर्ट अपोलो स्ट्रीटवरील हार्न्बी हाऊस-मधें भरत. नंतर ही इमारत ग्रेट वेस्टर्न हॉटेल म्हणून प्रसिद्ध झाली. सध्या या इमार-तीत कामा ओरिएंटल् संस्थेचें कार्यालय आहे. येथें कोर्ट भरत असे अशी पाटी अजूनहि तेथें आहे. हायकोर्ट स्थापनेनंतर १८७९ पर्यंत ओरीजिनल साईडची कोर्टें येथेंच काम करत व ॲपेलेट साईडचे न्यायाधीश माझगांवला तरला हॉलमध्यें बसत. १८७९ मध्यें गोथीक पद्धतीनें बांधलेल्या प्रचंड पाषाण–प्रासादांत ह्या दोन्ही शाखा एका छत्राखाली आल्या. ह्या इमारतीचे मध्यवर्ती जिन्याला मूलाधार नसल्यानें हा जिना आपल्या

---

**श्री. हरिहर उसॅंकर**

सिव्हिल जज्ज व ज्युडिशिअल मॅजिस्ट्रेट म्हणून काम केलें असून, सध्या मुंबई येथें प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट आहेत. मराठी–संस्कृत व इंग्रजी साहित्यांत लेखन. हिंदी व फ्रेंच परीक्षा सन्मानानें उत्तीर्ण. कांहीं संस्कृत नाट-कांचें संगीत दिग्दर्शन. निरनिराळया सन्मान-नीय सरकारी कमिट्यांवर नेमणूक.

---

११२ पौंड वजनानें कोसळेल या भीतीनें एका बॅरिस्टर साहेबांनीं तो कायम वर्ज्य केला होता. केवढी ही वैध्य सावधगिरी !

शिल्प म्हणजे घनीभूत संगीत (Architect is frozen music ) पण हायकोर्टाचे पश्चात गोष्टी कक्षेंत गेल्यास शिल्प म्हणजे एक गोठलेला फार्स आहे. ( Architect is frozen farce ) असें म्हणावेसें वाटतें. त्या लॉबीत एका मर्कट-न्यायमूर्तीची पाषाणमूर्ति कोरलेली दिसते. मर्कटाच्या एका डोळ्यावर बँडेटा बांधलें आहे आणि त्याचे हातातील तागडी त्यानें विषमतोल धरली आहे. बॅरिष्टरांच्या खास गळोट्या बांधलेले कोल्हे व लांडगे दाखवून ह्या अज्ञात शिल्पकारानें वकीलवर्गाला ही शिलांजली वाहिली आहे. हायकोर्ट इमारतीचे युरोपीयन कंत्राटदाराचे हाताखालीं काम करणाऱ्या एका पारशी पोट-कंत्राटदारानें पैसे वसूल करण्याकरितां त्या कंत्राटदारावर दावा लावला होता. दाव्याचा निकाल पारशाचे विरुद्ध लागला, तेव्हां त्यानें हायकोर्टाशी उभा दावा धरला; व म्हणून न्यायसंस्थवरील हें शिलाभाष्य रचून त्यानें न्यायसंस्थेवर चिरंजीव सूड घेतला. टागोरांच्या Hungry Stone च्या चालीवर Angry Stone असें ह्या किस्शाचें वर्णन करता येईल.

हायकोर्टाचे इतिहास भूगोलाकडून त्याचें अंतरंगाकडे आतां वळु या. न्यायसंस्थेचे व्याकरणात न्यायाधीश हा कर्ता, न्यायदान हें कर्म व वकीलवर्ग हें क्रियापद असें म्हणतां येईल. खरोखरच न्यायसंस्थेचा कर्ताकरविता म्हणजे न्यायमूर्तीच होत. न्यायाधिशाच्या व्यक्तिमत्वाचे प्रतिबिंब न्यायदानकार्यांत दिसून येते. किंबहुना न्यायाधिशाचे व्यक्तिमत्व हीच न्याय मिळण्याची अचूक गॅरंटी आहे.

गेल्या शंभर वर्षांत मुंबई हायकोर्टाचे १४ सरन्यायाधीश व १५२ न्यायमूर्ति झाले. स्वातंत्र्यपूर्व काळांतील बारा सरन्याया-धीश हे युरोपियन बॅरिष्टर होते. ब्रिटिश राजवटींत हिंदी न्यायाधिशाला किंवा कुणाहि सनदी नोकराला कायम सरन्यायाधीश नेम-ण्यांत आलें नाहीं, म्हणून स्वराज्यांतील पहिले कायम सरन्यायमूर्ती म्हणून न्या. छगला ह्यांची नेमणूक सर्वांना स्वागतार्ह वाटली. ह्यापूर्वी पहिले हंगामी सरन्यायाधीश म्हणून कांहीं काळ न्या. तय्यबजी ह्यांनीं काम पाहिलें होतें. न्या. छगला अमेरिकेंत राजदूत म्हणून गेल्यावर त्यांचे जागी सप्टेंबर १९५८ मध्यें न्या. चायनानी या आय्. सी. एस्. न्याय-मूर्तीची कायम सरन्यायाधीश म्हणून झालेली नियुक्ति वैशिष्ट्यपूर्ण झाली. त्यापूर्वी न्या. पारसन्स या सिव्हिलियन न्यायमूर्तींना हंगामी सरन्यायाधीश होण्याचा मान मिळाला होता. ते फार मुद्देसुद निकालपत्रें लिहित व त्यांचें मोठें निकालपत्र फक्त साडेसात पानें आहे.

बिशप क्रायटन या विचारवंतांनीं असें म्हटले आहे, कीं न्यायाधिशाला बुद्धिधनापेक्षां चारित्र्यधनाची अधिक आवश्यकता आहे. हायकोर्टाचे सर्व सरन्यायाधीश विद्वत्ता, चारित्र्य व न्यायप्रियता ह्या त्रिगुणांच्या दिव्य तेजानें तळपणारें असेच झाले. आद्य सर-न्यायमूर्ती सर मॅथ्यू सॉस हे सॉस द सायलेंट ( अबोल सॉस ) म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचें सर्व जीवन न्यायाच्या अलिप्ततेचें प्रतीक होतें. ते गव्हर्नमेंट हाऊसवर कधीं गेले नाहींत किंवा समाजांत दिसलेले नाहींत. किंबहुना आपल्या मनावर गांव–बातम्यांचा परिणाम होऊं नये म्हणून ते वर्तमानपत्रहि वाचत

नसत. न्यायाधिशानें न्यायदानाचे कामीं साक्षीदाराशिवाय शब्द ऐकायचा नाहीं व कोर्टाचे चार भिंतीकडील जगाकडे पाहूं नये अशी त्यांची निष्ठा होती. दर रविवारीं ते गिरगांव पोर्तुगीज चर्चमध्यें प्रार्थना करीत. त्यांचे मागून सर रिचर्ड कूच आले पण त्यांनीं कलकत्त्याला कूच केलें. पुढें ते प्रिव्ही कौन्सिलर झाले. त्यांचे नंतर आले स. न्या. वेस्ट्रॉप. हिंदु कायद्यावरील विवाद्य प्रश्नांवर त्यांची विद्वतापूर्ण निकालपत्रें प्रसिद्ध आहेत. निकाल देण्यास कधीं कधीं तें एक वर्ष घेत. दीर्घविचार हेंच अचूक विद्वत्तेचें गमक होय; असा त्यांचा विश्वास होता.

स. न्या. सार्जंट हे हायकोर्टाचे सर्वांत अधिक काल जज्ज व सरन्यायाधीश होते. सुमारें तीस वर्षें ते मुंबई हायकोर्टांत न्यायासनावर विराजले. साधी राहणी व उच्च विचारसरणीचें प्रतीकच तें होतें. सरन्यायाधीश असतांना वैयक्तिक बाबतींत कायद्याचा सल्ला घेण्यासाठीं एकदा ते श्री. इनव्हरॅरीटी या कायदेपंडिताच्या चेंबरमध्यें स्वतः गेले होते.

सर लॉरेन्स जेंन्कीस हे अत्यंत नाणावलेले सरन्यायाधीश होऊन गेले. त्यांनीं युरोपियन बॅरिष्टरांची कोंडाळी फोडून हिंदी बॅरिष्टरांना ओरिजिनल शाखेंत काम करण्यास उत्तेजन दिलें. म्हणून त्यांना हिंदी बारचे शिल्पकार म्हणतात. मूरकोर्ट (मयन्यायसभा) भरवून त्यांनीं ज्युनियर वकिलांना कोर्टाचे कामाचा अनुभव घेण्याची संधी दिली. हें मूरकोर्ट दर शुक्रवारीं पांच वाजतां जज्जांचे वाचनालयांत भरत असे. ही प्रथा आतां कांहीं लॉ कॉलेजमध्यें चालू आहे. न्या. जेंन्कीस हे विद्याप्रेमी होते. हिंदुधर्मशास्त्र वाचण्याकरतां ते संस्कृत शिकले. एकदां विल्सन कॉलेजमध्यें त्यांनीं स्कॉटचे कादंबऱ्यावर वाङ्मयीन व्याख्यान दिलें. स्वभावानें मात्र जरा लवकर गरम होत. त्यामुळें त्यांनीं शाकाहार स्वीकारला. कदाचित् गीतेंतील आहार विशेष व त्रिगुणात्मक मानवी स्वभाव यांतील कार्यकारणभाव त्यांना पटला असावा. त्यांचा पुतळा हायकोर्टाचे आवारांत भावी पिढीला मार्गदर्शन करीत आहे.

पहिल्या महायुद्धानंतर १९१९ सालीं सर नॉरमन मॅक्लाड हे मुख्य न्यायाधीश झाले. पटापट न्याय देण्याचें कामीं ते फार प्रसिद्ध होते.

एका दिवसांत ९६ शॉर्ट कॉझेस त्यांनीं संपविलीं होतीं. कदाचित हा विक्रम अद्यापि अजिंक्य असेल. व्यापारी-व्यवहारांतहि ते निष्णात होते. दि. ब. रावसाहेबांचे सुमारें पंधरा दिवस चालेल असें एक गुंतागुंतीचें अपील, त्यांनीं चार तासांत निकालांत काढलें. तेव्हां दिवाणबहादुर साहेब लायब्ररींत आले व उद्गारले. 'भयंकर मनुष्य !'

सन १९३० मध्यें आलेल्या न्या. बोमंट यांनीं जागच्याजागीं निकालपत्रें सांगण्यास सुरवात करून काम झटपट उरकण्याची एक युगप्रवर्तक नवदिशा दाखवून दिली. न्या. जेंन्कीस यांची विधिविशारदता व न्या. मॅक्लाड यांचा तडफदार उरक यांचा सुरेख संगम त्यांचे ठिकाणीं होता. संख्या व गुणवत्ता यांचा मणिकांचन योग त्यांनीं साधला होता. वेचक शब्द व प्रसाद हा त्यांच्या शैलीदार लेखनाचा स्थायीभाव होता. त्यांची न्यायप्रियता सर्वमान्य होती. राष्ट्रीय चळवळींत शिक्षा झालेल्या वकिलांची सनद रद्द करण्याचें कारण नाहीं असा निकाल देऊन सुजाण हिंदी जनमताला त्यांनीं मान दिला. त्यांचेनंतर न्या. स्टोन, न्या. छगला, न्या. चैनानी ह्यांनीं सरन्यायाधिशांची तेजस्वी परंपरा राखली आहे. न्या. चैनानी हे जनतेस त्वरित न्याय मिळावा हें उच्च विचारतत्व कार्यवाहित आणीत आहेत.

मुंबई हायकोर्टांतील न्यायमूर्तींची प्रभावळ खरोखर उज्ज्वल आहे. हिंदी लोकांविरुद्ध पूर्वग्रह असल्यानें बरीच वर्षें हिंदी न्यायाधीश नव्हते. न्या. जनार्दन वासुदेवजी हे पहिले हंगामी न्यायाधीश होत, तर १८८४ मध्यें न्या. नानाभाई हरिदास यांना पहिले कायम न्यायमूर्ती होण्याचा अपूर्व मान लाभला. त्यापूर्वीं अकरा वर्षांत नऊ वेळां त्यांनीं हंगामी जज्जाचें काम केलें. त्यानंतरच्या कालांत न्या. तेलंग, न्या. रानडे, न्या तय्यबजी, न्या. चंदावरकर, न्या. तेंडूलकर, न्या. गजेंद्रगडकर वगैरे थोर चारित्र्यघन विद्वानांची नक्षत्रमाला हायकोर्टाच्या आकाशांत चमकून गेली. ह्या सर्वांनीं हायकोर्टाखेरीज इतर क्षेत्रांतहि आपल्या व्यक्तिमत्वाचा ठसा उमटवला आहे.

न्या. रानडे हे सॉक्रेटीस म्हणून प्रसिद्ध होते. 'सर्वज्ञो वै माधवः' असें त्यांचेबद्दल म्हणत. त्यांची बुद्धि अष्टपैलू व विद्या चतुरस्त्र होती. त्यांच्या एम्. ए. च्या उत्तर–पत्रिका त्यांच्या गुणज्ञ इंग्रज परीक्षकांनीं ऑक्सफर्ड, केंब्रिजला पाठवल्या होत्या. ते कांहीं काळ मुंबईंत प्रेसिडेंसी मॅजिस्ट्रेट होते.

न्या. तेलंग हे न्या. कनीयांप्रमाणें वयाच्या ३९ व्या वर्षीं हायकोर्ट जज्ज झाले.

न्या तेलंग म्हणजे सरस्वतीचा कोहिनूर. संस्कृतप्रमाणें त्यांचे इंग्रजीवर इतकें प्रभुत्व होतें कीं त्यांना Mr. T. Lang म्हणत. हिंदु धर्मशास्त्रावर त्यांचें प्रभुत्व होते. त्यांची व्यवसाय व व्यासंगनिष्ठा इतकी जबर, कीं आपल्या मुलांना चर्नीरोड बागेंत ते फक्त पांच मिनिटेंच भेटूं शकत.

न्या. तेलंगांप्रमाणेंच न्या. चंदावरकरांचें इंग्रजीवर असामान्य प्रभुत्व होतें. त्यांचेजवळ एक ब्लॅकबुक असे. तें काळें पुस्तक म्हणजे वकिलांना काळपुरुष वाटे. कारण त्यांतून कोणता पूर्वनिर्णय (Precedent) काढून ते वकिलांचें तोंड गप्प करतील याचा नेम नसे. दीर्घोद्योग हें जुन्या जमान्याचे व्यवच्छेदक लक्षण सरसाहेबांजवळ खास होतें. न्यायमूर्ती असतांना दर शनिवारीं ते कमलाबाईच्या शाळेंत मॅट्रीकचा इंग्रजी वर्ग घेत असत.

न्या. लल्लूभाई शहा हे देवमाणूस होते. एका निरापराध माणसाला शिक्षा दिल्याचें लक्षांत आल्यावर त्यांनी काशीस जाऊन प्रायश्चित घेतलें. याच भीतीनें न्या. खारेघाट यांनीं कुणालाहि फांशीची शिक्षा दिली नाहीं, असें ऐकिवात आहे.

सिव्हिलीयन न्या. बोमन, न्या. बॅचलर, न्या. ब्रूमफील्ड, न्या. मांडगांवकर, न्या. बाबडेकर, न्या. राजाध्यक्ष वगैरे थोर न्यायाधीश आपल्या निस्पृहतेमुळें सर्ववंद्य झाले. न्या. माडगांवकर हे पहिले कायम हिंदी आय्. सी. एस. न्यायमूर्ती होत.

वयाच्या तेहतिसाव्या वर्षीं हायकोर्ट जज्ज होण्याचा मान न्या. बॅचलर या जिल्हा न्यायाधिशांना मिळाला. सुमारें बारा डिस्ट्रिक्ट जजेसना डावलून त्यांना बढती देण्यांत आली होती. ते गुजराती उत्तम जाणत.

न्या. बोमन यांना डोळ्यांनीं कमी दिसे. स्वतः ते पुरावा टाईप करीत व अलौकिक स्मरणशक्तीच्या जोरावर न्यायदानाचें कार्य चोख बजावीत. आंधळ्या न्यायदेवतेचे ते अक्षरशः प्रतीक होते. बावला खून खटल्यांतील त्यांचे जूरीचें सारांश-कथन आदर्श मानलें जातें.

न्या. रसेल यांना रोगामुळें झोंप अनावर होई. ते न्यायासनावर उभे राहात किंवा फेऱ्या घालीत वकिलांच्या तक्रारी ऐकत. त्यांनीं Sleeping Beauty म्हणत.

मुंबई हायकोर्टांतील न्यायाची उच्च परंपरा या सर्व न्यायाधिशांनीं जोपासली व त्यामुळेंच लोकशाहीच्या या युगांत भारतीय जनतेला मूलहक्कांचे संरक्षण हायकोर्टाद्वारें अखंड होईल हा विश्वास वाटतो व यांतच मुंबई हायकोर्टाचा चिरविजय आहे.

* • •



अनुक्रमणिका



*त्या दिवशीं त्यानें जणूं आपलें नवतारूण्य व मानासिक सौंदर्यच त्या गीताचेंद्वारा अर्पण केलें. त्याच क्षणीं वाऱ्याची एखादी झुळूक यावी तशी त्याला एकदम मियाची आठवण झाली. त्याच्या शरीरांतील प्रत्येक बिंदूला मियाबद्दल ओढ वाटत होती.*

—श्री. ज. जोशी



'हॅलो! ठीक आहे ना?' 'हंन्सूने' 'इंगलला' विचारले, 'इकडे कुठे गेला होतास?' इंगलचा चेहरा गोरामोरा झाला. 'हंन्सूच्या' प्रश्नाला उत्तर देणें त्याला शक्यच नव्हतें.

आपण कुठे गेलो होतो हे 'हंन्सूनला' नक्कीच माहीत असणार याबद्दल 'इंगलची' खात्री होती. प्रश्नाचें उत्तर त्यानें मुद्दामच टाळलें.

हंन्सूने मात्र त्याचा पिच्छा पुरविल्यासारखे केलें. त्याने तोच प्रश्न पुन्हा एकदा त्याला मोठ्याने विचारला. 'इंगलला' उत्तर देणें मग भाग पडलें. तो म्हणाला, 'इकडेच...तुझ्या घरीच जरा काम होतें...पण तू आज घरी लवकर कसा परत आलास?...ऑफीस लवकर सुटलं वाटतं?'

'होय! आज मी जरा लवकरच आलो आहे!' हंन्सूने सांगितलें व मग कांहींच न बोलता तो एकदम गप्प झाला. त्या दोघां मित्रांमध्यें एक चमत्कारिक शांतता पसरली.

'इंगलला' तर अगदीच गुदमरल्यासारखे वाटायला लागलें. 'मियाची' अशा तऱ्हेची चोरून त्याने आज प्रथमच भेट घेतली होती. पूर्वी तो तिला हंन्सूच्या देखतच भेटत असे. हंन्सूला मियाच्या व त्याच्या मैत्रीबद्दल काही विपरीत वाटत असेल अशी त्याला कल्पनाही नव्हती. एखाद्या मित्राच्या बायकोशीं बोलावें त्याप्रमाणें इंगल 'मियाशी' मोकळेपणाने बोलत असे. त्यामुळें हंन्सूच्या मनांत कोणतेही किल्मिष तोपर्यंत आलेलें नव्हतें. सगळा मनमोकळा कारभार होता.

रोजचेच कपडे

# सनलाइटनें

## किती शुभ्र आणि लख्ख !




निर्मळ आणि सुरेख, शुभ्र आणि लख्ख !
यालाच म्हणतात सनलाइटची धुलाई ! आपले
सर्व कपडे सनलाइटनें घरींच धुवा !

**सनलाइट उत्कृष्ट फेसाचा शुद्ध साबण**

S. 32A-X52 MA

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन








'इंगलला' स्वतःचेच फार आश्चर्य वाटलें. इतकी मैत्री असतांना आजच आपण हंन्सूला खोटे का सांगितलें हें त्याला कळेना. हंन्सू मियाला घेऊन नेहमी त्याच्याकडे येई व त्याला स्वतःकडे बोलावीत. हंन्सूकडे इंगलनें जाणे यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींच नव्हतें. खोटें बोलण्याची तर मुळीच जरूरी नव्हती. मग तो आजच असे कां वागला होता? हंन्सूच्या अपरोक्ष मियाकडे गेल्याचें त्यानें लपवून कां ठेवले होतें.?... या प्रश्नांची उत्तरें त्याची त्यालाच देता येईनात. त्यानें जास्त विचार केला आणि तो शरमिंदा झाला. आपल्या अशा दुटप्पी वागण्यामुळें 'मियाचे' नांव आपण बदू केलें आहे याची त्याला एकदम जाणीव झाली.

हंन्सूचे आणि मियाचे प्रेम जमण्यापूर्वी कितीतरी दिवस अगोदर ती इंगलला ओळखत होती. त्यांची मैत्री तेव्हांपासून कधीही संपलेली नव्हती परंतु मियाला इंगलबद्दल काय वाटत होतें? तिच्या त्याच्याविषयीं काय भावना होत्या? त्या भावना नुसत्या मैत्रीच्याच होत्या कां? तिला त्याच्याबद्दल प्रेम वाटत होतें कां नव्हतें? तिचें त्याच्याशीं वागणें प्रेमाचें होतें का त्यांत फक्त सहानुभूती होती? इंगल जसजसा जास्त विचार करीत गेला तसतसे त्याला कांहींच कळेना. त्याला स्वतःचीच कींव आली.

यातून मार्ग काढण्यासाठीं कांहींतरी केलें पाहिजे असें त्याला वाटलें. 'मिया'वर प्रेम करायचे तर हंन्सूची मैत्री सोडली पाहिजे हें उघड होते. परंतु त्याने हंन्सूला तर खोटेच सांगून टाकलें होतें. आतां त्याचा तो मार्ग बंद झाला. आतां 'मिया'शी असलेले प्रेमसंबंध सोडणें व या सर्व प्रकारणांतून मोकळे होणें एवढीच एक गोष्ट करता येण्याजोगी होती.

दुसऱ्या दिवशीं इंगल घरींच राहिला. हंन्सूसारख्या मित्राला फसविल्याबद्दल त्याला पश्चाताप होत होता. मियाचें प्रेम तोडून टाकायचे व तिची कधीं भेट घ्यायची नाहीं, हें त्यानें मनांत पक्के ठरविलें होतें. तरीही त्याच्या मनांत चमत्कारिक अशांतता निर्माण झाली होती. खरे म्हणजे त्याला त्या दिवशीं खूप काम होतें. त्या दिवशीच काव्यगायनाची मैफलही होती. तिकडे त्याला जायलाच पाहिजे होते. परंतु मनाच्या अशा अवस्थेंत मैफलीला जावे व मित्रमैत्रिणींच्या आनंदांत विरजण घालावे हेही त्याला पटेना. काय करावें हेंच त्याला समजेना.

तो एक चांगल्यापैकीं लेखक होता. परंतु 'मिया'चे मन त्याच्यापेक्षां जास्त तरल व संवेदनाक्षम होतें. तिचें वाचनही खूप होतें. तिच्या सहवासांत त्याला भारल्यासारखें होई व त्याच्या लेखनशक्तीला जास्त जास्त बहर येत जाई, पूर्ण चंद्रामुळें समुद्राला भरती यावी त्याप्रमाणें तिच्या सहवासात त्याचें लेखन जास्त जिवंत आणि जास्त प्रभावी होई. त्याच्या लेखनास तिच्या सान्निध्याची जरुरी असे. तिच्या शिवाय त्याची काव्यशक्ति पांगळी होई. हंन्सूची ओळख होण्यापूर्वीच तो 'मिया'ला ओळखत होता. त्यावेळेपासूनच तो तिच्यावर प्रेम करीत होता. एका दृष्टीनें त्या दोघांच्या संबंधांत हंन्सूनेंच बिघाड घातला होता. दोष द्यायचाच असला तर हंन्सूलाच द्यायला पाहिजे होता. इंगल मुळींच दोषी नव्हता.

विचारांचे हें चक्र इंगलच्या मनांत फिरत असतांनाच हंन्सू आंत आला व त्यानें नेहमीप्रमाणें त्याच्याशी बोलण्यास सुरवात केली. त्याचें तें तसें येणें हंन्सूलला आवडलें नाहीं. तो येण्यापूर्वी त्याचें मन सुखस्वप्न विणत होतें. हंन्सू आल्यामुळें त्या सुंदर स्वप्नांना फार मोठा तडा गेला.

त्याच्या पाठीवर थाप मारून हंन्सू मोकळेपणानें बोलतच होता. 'काल तूं मला खोटं सांगितलंस! मला फार आश्चर्य वाटलं. माझ्या लक्षांत येत नाही की तुला खोटं सांगावसं कां वाटलं? हंन्सू इतका मोकळेपणाने बोलत होता की त्याच्या मनावर कसलेच दडपण दिसत नव्हतें. त्याचें मन नेहमींप्रमाणें स्वच्छ होतें.

इंगलचा चेहेरा मात्र पडला होता. नेहमीप्रमाणें हंसत हंसत उत्तर न देता तो गंभीरपणाने हंन्सूकडे बघत होता. हंन्सू म्हणत होता, 'तुला काय वाटलं?...मला तुझा हेवा वाटेल?...मला तूं भिऊन खोटं सांगितलस?...तू मियाकडे गेला होतास ही गोष्ट तू माझ्यापासून कां लपवून ठेवलीस?'

'मला फार वाईट वाटतं. पण आतां काय करणार?'

'म्हणजे आतां यापुढे तुझें व माझें मैत्रीचे संबंध रहाणार नाहींत असंच ना? तुला 'मिया' हवी आहे. मलाही ती हवी आहे! म्हणजे 'मिया'च्या प्रेमाच्या बाबतीत तू आणि मी शत्रू आहोत असंच ना?'

'बघूं काय होतें तें!'

'तूं वेडा तर नाहीस! एका स्त्रीमुळें आपल्या मैत्रींत बिघाड व्हावा हें तुला पटत कां?'

"अजून तितकीशी वेळ आलेली नाही. आणि 'मिया' म्हणजे एकादी बाहुलीही नाही. तिलाही तिचे स्वतःचे विचार आहेत... तिच्या स्वतःच्या आवडीनिवडी आहेत. तिचेंच मत याबाबतीत निर्णायक म्हणून समजावें लागेल."

"म्हणजे तू मियालाच विचारणार असें म्हण की! तिला कोण आवडेल त्याच्या बरोबर ती राहील असें तुला म्हणायचें आहे ना?"

"मी अजून याबाबतींत विचार केलेला नाहीं."

"मला जास्त कांहीं सांगायचें नाहीं. तिच्याविषयींचें माझें प्रेम तुला माहीत आहेच. तें जास्त खोल आहे... तें जास्त मनापासून केलेलें आहे. तुला तसें प्रेम तिच्यावर करणें शक्य नाहीं."

इंगलने कांहीच उत्तर दिलें नाही. 'हंन्सूचे' मियाबद्दलचें प्रेम निव्वळ शारीरिक आहे असें त्याला वाटत होतें. परंतु तसें स्पष्ट सांगणें त्याला शक्य नव्हतें. गेले कित्येक दिवस हंन्सू आणि मिया ही लग्नाच्या नवराबायकोसारखी एकत्र रहात होती. त्यांच्या प्रेमाबद्दल कांहीं बोलणें म्हणजे निष्कारण कटुता निर्माण करण्यासारखें होतें.

बोलणें अगदींच थांबलें. मग हंन्सू घरीं जाण्यासाठीं उठला व म्हणाला, आमच्याकडे ये ना!"

परंतु इंगलने त्याला जाऊं दिलें नाहीं. तो म्हणाला, "हंन्सू थोडा वेळ थांब! मला तुझ्याशीं कांहीं महत्त्वाचें बोलायचें आहे."

"आतांच तें बोलण्याची कांहीं जरूरी नाही. पुन्हा एकाद वेळेला बोलूं. आज आपली दोघांचीही मनःस्थिती ठीक नाहीं असें वाटतें" इतकं बोलून हंन्सू झपाट्यानें निघाला. परंतु इंगल त्याच्या पाठोपाठ धांवलाच.



'मला आताच बोललें पाहिजे.' इंगल गंभीर आवाजात हंन्सूच्या डोळयाला ढोळा भिडवीत म्हणाला, 'माझें मियावर प्रेम आहे... तिचेंही माझ्यावर आहे असें वाटतें. परंतु मी मियाला सोडून देण्यास तयार आहे.'

'आतां तर कुठें सुरुवात आहे. इतक्यातच माघार घ्यावी असें तुला वाटलें. याचेंच मला आश्चर्य वाटतें.'' हंन्सू तीव्र आवाजांत म्हणाला, ''आपल्या साऱ्यांचेच हित कशांत आहे हें बघितलें पाहिजे. मला कुणाचें नुकसान करायचें नाही. मियाविषयीं मला नीट विचार करायला पाहिजे. भावनेच्या आहारी जाणें बरोबर होणार नाही. दुसरा एखादा माणूस असतां तर त्यानें आतांच तुझ्याशीं मारामारी केली असती. तुला मियाकडे जाऊ दिलें नसतें. पण मला तसें करावयाचें नाहीं.'

'पण मानवी भावना म्हणजे काही एखादे गणित नाहीं. त्यांत कित्येक धागेदोरे गुंतलेले असतात. मियाला सोडून द्यायचें असें तूं जरी ठरविलेस, तरी त्यांत तुझ्या मनाला त्रास होणारच. मियालाही त्यांत क्लेश आहेत. तुमच्या भावना एकमेकांत गुंतलेल्या आहेत. त्यांना कांहीच किंमत नाही असें मला वाटत नाहीं. आपणही दोघे मित्र आहोत. आपल्याही कांहीं एकमेकांविषयीं भावना आहेत. त्यामुळें हा प्रश्न जास्तच अवघड झाला आहे. मला वाटतें आपण कांहीं दिवस थांबावे. काहीं काळ गेल्यानंतर आपणाला आपोआपच मार्ग सापडेल.'

'मियाला आपल्या दोघांवरही प्रेम करतां येईल. तें सहज शक्य आहे. काल तूं माझ्या घरांतून बाहेर पडतांना मी तुझ्याशी ज्या पद्धतीनें वागलो तसें वागायला नको होतें. म्हणूनच मी मुद्दामच तुझ्याकडे आज आलो. तुला भेटण्याची मियाला इच्छा आहे. तुझ्यातले कांहीं गुण तिला आवडतात. ते गुण माझ्या अंगांत नाहींत. पण मीही तिला आवडतो.''

''तुझें म्हणणें कदाचित बरोबर असेल. परंतु नेहमीच आपल्याला भावनांना आवरतां येत नाही... कधीं कधीं मन मोकळें सुटतेंच.'' इंगल दुःखी आवाजांत म्हणाला, '' मला काय म्हणायचयं हें तुझ्या लक्षांत आलेलं नाही. तें कांहींहि असलं तरी तू माझ्याशीं कालच्याप्रमाणें वागूं नकोस एवढीच विनंती आहे.''

''बर तर... कालच्याप्रमाणें मी वागणार नाही.'' हंन्सू म्हणाला व दोघांनी मग हात मिळविले.

त्या रात्री काव्यगायनाची मैफल होती. इंगल स्टेजवर येऊन बसला. तेव्हापासूनच त्यानें शांत रहाण्याचा प्रयत्न चालविला होता. परंतु दर क्षणाला त्याच्या मनाची अस्वस्थता वाढतच चालली होती. काव्यगायन करण्याची त्याची वेळ आली तेव्हां तर तो अक्षरशः कापत होता. खरे म्हणजे त्याच्यासारखे आणखी कित्येक कवी त्या मैफलीत भाग घेणार होते. परंतु त्याला मात्र वाटत होतें की तो एकटांच त्या दिवशीं काव्यगायन करणार आहे आणि बाकीचे सारे प्रेक्षक त्याच्याच कविता ऐकण्यासाठी त्या हॉलमध्यें जमलेले आहेत.

अखेर त्याची वेळ आलीच. तो उभा राहिला आणि थरथर कापत त्यानें त्याचें आवडतें प्रेमगीत म्हटलें. गीत म्हणतांना त्यांतील भावनांशी तो क्षणार्धात एकरूप झाला. त्याचें निराळेंपण लागलीच वितळून गेलें. त्या दिवशीं त्यानें जणूं आपलें नव तारुण्य व मानसिक सौंदर्यच त्या गीताद्वारा लोकांना अर्पण केलें. त्याच क्षणी वाऱ्याची एखादी झुळूक यावी तशी त्याला एकदम मियाची आठवण झाली. तो गीत म्हणत होता. पण त्याच्या शरीरांतील प्रत्येक बिंदूला मियाबद्दल ओढ वाटत होती. त्याचें अंतर्मन विचारत होतें, 'मिया आज येथें आली असेल कां ?'...ती हें काव्यगायन ऐकत असेल कां ?... त्याच्या समोर प्रेक्षकांत माणसेंचमाणसे बसली होती. चेहऱ्यांचा समुद्रच जणूं समोर उसळला होता. तो गीत गात होता परंतु त्याचें मन समोरच्या चेहऱ्यांच्या समुद्रांतून मियाचा चेहरा हुडकून काढण्यांत मग्न होतें...... अखेर त्याला तो चेहरा दिसलाच. प्रेक्षकांमध्ये बसून ती जीवाचा कान करून त्याचें गायन ऐकत होती. आपली कविता तिच्या कानांवर पडत आहे. याच भावनेनें त्याला बेहोशी आली होती.

काव्यगायन संपलें आणि ती हंसत हंसत त्याच्याजवळ आली. '' हंन्सू कोठें आहे ? '' इंगलने पहिला प्रश्न केला.

''त्याला काम होतें. तो येऊं शकला नाही.'' तिनें सांगितलें.

त्याच्या दोन जिवलग माणसांपैकीं फक्त एकच माणूस त्याचें काव्यगायन ऐकण्यासाठीं येऊं शकलें. याबद्दल खरें म्हणजे त्याला मनांतून वाईट वाटायला पाहिजे होतें परंतु तसें कांही झालें नाही. त्याच्या मनाची बेहोशी वाढतच गेली.

ती सांगतच होती. ''पुढें जेव्हां तू मी असतांना कविता म्हणशील तेंव्हां सरळ माझ्या डोळयाला डोळा लावून म्हणत जा, एवढें तू माझं ऐकच !''

'बर तसे करीन' त्यानें तिला सांगितलें. तिच्या सांगण्यांत आज त्याला जास्तच आपलेपणा व प्रेम वाटलें. तिचें मन आणि आपलें मन जास्तच गुंतत चालल्यासारखें वाटलें.

कविता म्हणण्याची त्याची दुसऱ्यांदा पाळी आली व तो स्टेजवर जाऊन बसला. काल-परवापर्यंत 'मिया'च्या प्रेमाबद्दल त्याची खात्री होती. पण आतां त्याला त्याबद्दल जास्तच विचार यायला लागले. तो मनांत म्हणाला, 'कोणती चांगली स्त्री दोन पुरुषांवर एकाच वेळी प्रेम करूं शकणार नाही. असें करणें म्हणजे अप्रामाणिकपणा आहे'.

त्या विचारानें त्यानें स्टेजवरूनच मियाकडे बघितलें. तिचें हंसणें अगदीं स्वच्छ होतें. चेहरा ताजा टवटवीत होता. त्याला वाटलें, मिया अप्रामाणिक असेल कां? ती तशी नसेल असें त्याचें मन सांगत होतें. पण मग त्याच्या मनांत विचार आला की तिचें जर हंन्सवर प्रेम असेल तर तिनें आपल्याशीं असें कां वागावें...... आपल्या काव्या-बद्दल इतकी आपुलकी कां दाखवावी? त्याचें त्यालाच मग कांहीं कळेना. त्याच्या मनांतच विलक्षण गोंधळ उत्पन्न झाला. कविता म्हणण्याची त्याची दुसरी पाळी आल्यानंतर तो पुढें झाला. त्याला मियाचे शब्द आठवले. परंतु तिच्या डोळ्याशी डोळा तो भिडवू शकला नाहीं. त्यानें खालीं मान घातली व मियाकडे मुळींच न बघता कवितेचें वाचन संपविलें.

कार्यक्रम संपल्यानंतर तिनें त्याला शाबासकी दिली व म्हटलें, 'तुझ्या कविता फारच छान होत्या. त्या तू म्हटल्यासही सुंदर ...आतां तू खूप दमला असशील. तुला भूकही लागली असेल.' हे म्हणत असतांनाच तिनें त्याच्या हातात चॉकलेटची भली मोठी वडी ठेवली. ती खातखातच त्या दोघांची पावले मियाच्या घराकडे वळली. इंगल थोडासा अस्वस्थच होता. स्वतःच्या प्रेमाविषयींचे विचार त्याच्या मनाला त्रास देत होते. परंतु मिया मात्र मनमोकळेपणाने बोलत होती. घरी जाईपर्यंत इकडचें तिकडचें बोलणें तिनें कौशल्यानें चालविलें होतें. त्या दोघांच्या व्यक्तिगत संबंधाविषयीं कांहींहि बोलणें तिनें मोठ्या कटाक्षाने टाळलें होतें.

नंतर ती म्हणाली, 'उद्या माझा वाढदिवस आहे. आमच्याकडे तू जेवायला यावस अशी हंन्सूची इच्छा आहे. मला स्वयंपाक विशेष चांगला करता येत नाही. पण उद्या मी तुझ्यासाठीं काहीतरी खास बेत करीन, तू येशील काय?'

"उद्यां तुझा वाढदिवस आहे?" इंगलने कांहीं वेळ जाऊं देऊन विचारलें. त्या कारणासाठीं तिला पुन्हा भेटण्याची इच्छा नव्हती.

"होय. हंन्सूपाशीं मी रहायला लागल्याला उद्यां वर्ष होईल. उद्याच आमच्या दोघांचा एकत्र रहाण्याचा वाढदिवस येतो."

हें ऐकतांच इंगलला बरें वाटलें. मिया हंन्सूची जणुं लग्नाचीच बायको आहे असें त्याला वाटलें. ती त्याची धर्मपत्नी असल्यास इंगलला तिच्याविषयीं काहींच भावना बाळगण्याचा अधिकार नव्हता. तिच्या सहवासांत चोरटेपणा वाटण्याचेंही कारण नव्हतें. तिच्याकडे मनमोकळेपणानें जायला आतां कांहींच हरकत नव्हती.

दुसऱ्या दिवशीं ठरलेल्या वेळी तो त्यांच्याकडे गेला. तेव्हां हंन्सूने त्याचें मनापासून स्वागत केलें. मिया स्वयंपाकांत मग्न होती. तिच्या ॲप्रनच्या बाह्या वरपर्यंत गुंडाळल्या होत्या. शेगडीत तिनें विस्तव पेटविला होता. बटाटे सोलले होते. तांदुळ धुतले होते व भाज्या धुवून चिरण्यासाठीं तयार होत्या.

अशा अवस्थेंत इंगलने मियाला त्या दिवशीं प्रथमच बघितलें. स्वयंपाक घरांतील काम करीत असतांना तिला पाहून त्याला बरें वाटलें नाहीं. ती त्याला विशेष सुंदर दिसली नाहीं. हंन्सूकडे एकच खोली होती. कोपऱ्यात स्वयंपाक चालला होता. दुसऱ्या कोपऱ्यात कॉट होती. एका बाजूला दोन खुर्च्या आणि एक टेबल होतें. आल्या-गेल्याला बसण्यासाठीं त्या खुर्च्यांचा उपयोग होत असे. एकाच खोलीत सर्व व्यवहार चालत असल्यामुळें तेथून इंगलला उठून बाहेर जाता येणेंही शक्य नव्हतें. तर त्या खुर्चीवर बसून रहाणेंच भाग होतें.

जेवणें संपली होतीं. रात्रीचे दहा वाजून गेले होते. गप्पा संपत आल्या होत्या. इंगल परत निघण्याच्या विचारांत होता. इतक्यांत हंन्सू म्हणाला, "आजची रात्र तू इथेंच झोप की! आतां थोड्याच वेळांत कर्फ्यू सुरू होईल. आणि मलाही तुझ्याशीं आज थोडें बोलायचें आहे." इंगललाहि तेथें जास्त वेळ रहाण्याची इच्छा होती. यापुढें तो मियाला भेटणार नव्हता. आज त्या दोघांशी गप्पा मारीत बसणें त्याला आवडलें असतें. परंतु एकाच खोलीत तिघांनी झोपण्याची कल्पनाच त्याला कशीतरीच व ओंगळ वाटली. आणि त्यानें जाण्याची इच्छा दर्शविली. मग मिया म्हणाली, "रहा की रे आज!...आतां कर्फ्यू सुरू होईल. तू बाहेर पडलास तर बहुधा पोलिसांच्या हातांत सांपडशील. तुला रहाणेंच भाग आहे."

त्यांचें म्हणणें खरेंच होतें. कर्फ्यूची वेळ झाली होती आणि तिथें राहिल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. कां कुणास ठाऊक पण मग एक चमत्कारिक शांतता त्या तिघांमध्यें पसरली. मिया गाद्या घालीत होती आणि तो कुचंबून बसला होता. त्याला भारीच अवघडल्यासारखें वाटत होतें. हंन्सूलाही तसेंच कांहीं तरी चमत्कारिक वाटत असावें. तोही अस्वस्थ दिसत होता. गाद्या घालताना त्या मानानें मियाच शांत होती.

शेवटीं ती शांतता हंन्सूच्या बोलण्यामुळें भंगली. तो म्हणाला, "इंगल आता तुझी वेळ आहे. पुढें हो आणि माझ्या देखत मियाला मिठीत घे. तुमच्या दोघांचेहि एकमेकांवर प्रेम आहे. त्याची परिणती आज होऊं दे."

हें बोलणें इंगलला कसेतरीच वाटलें. त्याला हंन्सूचा फार रागहि आला. तो म्हणाला, "तू मला मूर्ख समजतोस की काय?"

"मुळींच नाही. प्रत्येकानें आपल्या भावनांना वाट करून दिली पाहिजे. नाहींतर फार त्रास होतो. तुमच्या दोघांचे प्रेम तसेंच कोमेजून जावें असें मला वाटत नाहीं."

"तू काय म्हणत आहेस हेच मला कळत नाहीं."

"तुझें आणि मियाचें प्रेम आहे. प्रेमाचा योग्य तो शेवट शरीरसंबंधांत होतो असें माझें मत आहे. आज तुम्हांला ही मी संधी देत आहे."

"तू काय बोलत आहेस तें तुझें तुला तरी कळत आहे कां? मी आणि मिया निव्वळ पशू आहोत असे तुझें मत आहे काय?"

हंन्सूच्या सूचनेमुळे इंगलला फार राग आला होता. स्वतःचा अपमान झाल्यासारखा वाटत होता.

आपल्या कल्पना जास्त स्पष्ट करण्याची हंन्सू कोशीश करीत होता. मियाकडे वळून तो म्हणाला, "तुझें इंगलवर प्रेम आहे, त्याबद्दल मला तुझा हेवा वाटत नाहीं. तुम्ही दोघांनी मला नीट समजून घ्यायला हवं."

"हंन्सू तुझें म्हणणें मला समजतें. पण तू सांगतोस त्या तऱ्हेनें वागणें चमत्कारिक आहे–पशूसारखें आहे." मिया म्हणाली, हंन्सूनें पुढें मांडलेल्या सूचनेबद्दल तिला मुळीच आकर्षण वाटलें नव्हतें हें स्पष्ट होतें.

"मग मी काय म्हणालो तें विसरून जा. माझें म्हणणें मी मागें घेतो."

अनुक्रमणिका






"असं कशाला ? आपण हें सारें प्रकरणच विसरून जाऊं" ती म्हणाली, मग कोणीच कांही बोललें नाही. अंथरुणें फक्त दोन माणसांना पुरेशी होती. त्यावर आज त्या तिघांना झोपायचें होतें.

झोपण्याची वेळ झाली. तेव्हां हंन्सू गादीच्या अगदीं शेवटच्या टोकाला झोपला–मिया आधीच दुसऱ्या टोकाला झोपली होती. मिया-जवळ झोपायला लागणार हें ओळखून इंगलला कसेतरीच वाटलें. तो स्पष्टपणानें म्हणाला, " तुमच्या दोघांच्यामध्यें मी झोपणार नाहीं."

इंगलकडे पहात हंन्सू म्हणाला, "आता काय झालं ? तुम्हा दोघांवरहि माझा विश्वास आहे हें मी पुन्हा पुन्हा दाखवत आहे आणि तू मात्र गैरसमज करून घेत आहेस. तू अगदींच सामान्य माणसासारखा वागत आहेस."

इंगलचा चेहरा गोरामोरा झाला. परंपरेचा पगडा स्वतःवर किती आहे हें त्याला कळून आलें, त्याचें मन फारच निरागस्त आणि स्वच्छ होतें. यांतच त्याचा मोठेपणा होता. सामान्य माणसापेक्षां हंन्सू अगदीं निराळा होता.

दिवे मालवले गेले आणि सगळीकडे शांतता झाली. इंगलला मात्र झोप येणें शक्यच नव्हतें. हंन्सूबद्दलच त्याचे विचार चालले होते. अशा तऱ्हेनें चमत्कारिक–थोडी फार अनैसर्गिक सूचना हंन्सूने करावी याचेंच इंगलला नवल वाटत होतें. त्यानें अशी सूचना कां केली असेल ?......तो आपली किंवा मियाची परीक्षा बघत असेल का ?......हंन्सूचे मियावर खरें खरें प्रेम तरी असेल कां ?......कितीतरी शंका इंगलच्या मनात धुमाकूळ घालायला लागल्या...कदाचित् असेहि असेल की हंन्सू हा खरोखरच असामान्य असेल. त्याच्या व मियाच्या प्रेमाला मान्यता देण्याइतका मनाचा मोठेपणाहि हंन्सूजवळ असेल... या शंकाकुशंकानी त्याला फार भंडावून सोडलें. शेवटीं बऱ्याच वेळानें तो थकून झोपी गेला.

कांहीं वेळानें त्यानें डोळे उघडले तेव्हां खोलीत दिवा होता आणि मिया त्याच्या मिठीत झोपली होती. हंन्सू कुठे आहे, हें बघण्या-साठीं म्हणून त्यानें निजल्या निजल्याच मान वळविली. खुर्चीवर बसून हंन्सू पुस्तक वाचत होता. त्याच्याकडे त्या अवस्थेंत बघणें ही त्याला नकोसें वाटलें व त्यानें डोळे मिटून घेतलें. मियाच्या वागणुकीचा मात्र त्याला मुळीच उमज पडेना. लोळत लोळत चुकीनें त्याला हंन्सू समजून ती त्याच्या मिठीत आली होती कां ! किंवा हंन्सूने आणि मियानें दोघानीहि हें नाटक त्याची परीक्षा घेण्याकरिता मुद्दाम केलें होतें ? प्रश्नोपप्रश्नांच्या या कोलाहलात तो पुन्हा झोपीं गेला. हंन्सू परत गादीवर येऊन केव्हां झोपला हें त्याला कळलेंहि नाहीं.

दिवस उगवला. इंगल जागा झाला. तेव्हांही मिया त्याच्या शेजारीच झोपली होती. हंन्सू कुठेतरी बाहेर गेला होता. त्या घरांतून एकदम निघून जावें असें इंगलला वाटलें. त्यानें मियाच्या चेहऱ्याकडे बघितलें. ती झोपली होती. चेहरा अगदीं शांत होता, लहान मुला-सारख्या त्या चेहऱ्याकडे बघितल्यावर तिची निर्भत्सना करण्याचा विचारही मनांत येणें शक्य नव्हतें. त्याला वाटलें, या सर्व प्रकरणांत हंन्सूचाच दोष असायला पाहिजे. आपणाला जाळ्यांत पकडण्यासाठीं. म्हणून हंन्सूनेच हें सारें घडवून आणलें असलें पाहिजे. आपण आतां निघून गेलो. तर हंन्सूचेच फावेल ! आपणाबद्दल नाही नाही त्या शंका घ्यायला त्याला मोकळे रान मिळेल. एकदम निघून जाणेंही आतां त्याला कठीण होतें. मग इंगल अंथरुणावर तसाच पडून राहिला.

थोड्या वेळानें हंन्सू परत आला. त्यानें विचारलें, 'झाली कां झोप ?' हें विचारतांना त्याचा आवाज अगदीं पूर्णपणें मोकळा होता. त्यात किल्मिष असे बिलकूल नव्हतें. त्याच्यावरचा राग दाखविणे त्यामुळेंच इंगलला कठीण होत होतें.

'झोप बरी झाली' तो अगदीं नाइलाजानें म्हणाला व उठला. नंतर कपडे केले आणि हंन्सूला विचारलें, 'मियाच्या आणि माझ्याबाबतीत काय करावयाचें ठरविलें आहेस तू ?'

'ठरवायचं काय ? काहींच करायचं नाहीं.'

'खरं बोलशील तर बरं !'

'तु काय म्हणतो आहेस हेंच मला कळत नाही.'

'मला खरं वाटत नाहीं.' तुला माझा थोडादेखील मत्सर वाटत नाहीं का ?'

'अच्छा !...हें तुझ्या मनांत आहे. आतां आलं लक्षांत. तुझ्या-विषयीं मत्सराची भावना आवाक्यांत ठेवण्याचा मी प्रयत्न केला आणि मला आतां ती गोष्ट साधली आहे. खरंच सांगतो, मला तुझ्याविषयीं मुळीदेखील मत्सर वाटत नाही. तू एक कवि आहेस, तुझ्या भावना तरल आहेत, पण प्रत्येक गोष्टीकडे एका विशिष्ट दृष्टीनें बघण्यांत तू चूक करीत आहेस. त्यामुळें तुला त्रास होतो. लोकांनाही त्रास होतो. काल रात्री तू गैरसमज करून घेतलास. तुला वाटलं की मी तुझी आणि तुझ्या प्रेमाची टर उडविण्यासाठींच कालचा प्रसंग मुद्दाम योजलेला होता. तुझें हें वागणें अगदीं चूक आहे."

इंगलला पुन्हा शरमल्यासारखं वाटलं. हंन्सू हा त्यांच्यापेक्षां जास्त उदार, आणि जास्त प्रगत विचारांचा आहे ही गोष्ट त्याला मनांतल्या मनांत कबुल करावी लागली. त्याचवेळीं मिया जागी झाली व डोळे चोळीत अंथरुणावर उठून बसली. तिच्याकडे न बघताच इंगल हंन्सूला म्हणाला, तुम्ही दोघांनीच लग्न करणें योग्य आहे. अगदीं आजच्या आज केलंत तरीसुद्धां चांगलें होईल.

मियाला त्या सर्वच बोलण्याची गंमत वाटली. सकाळच्या वेळी खोलीमध्यें अशा तऱ्हेनें गंभीर आणि तात्विक विषयावर त्या दोघांमध्यें संभाषण घडावें याचेंच तिला हसू आलें. ती म्हणाली, "कांहींतरी काय बोलत आहेस तू ! इतक्यांत लग्न करण्याची काय घाई आहे !" हंन्सूनेही इंगलला विचारलें, -मी अगदी आतांच–या मिनिटाला लग्न करायला तयार आहे पण पैशाचें काय? लग्न केल्यावर मला हल्लीपेक्षां जास्त पैसा लागणार, तो मी कोठून आणूं ?"

'पैशाची काळजी करूं नकोस. मी तुला पैसे देईन,' इंगल म्हणाला.

'छे छे!' 'मिया ओरडली., 'तुझे कर्ज फेडायला आम्हांला फार दिवस लागतील, तसं नकोच !'

शेवटीं इंगलनेच त्या अडचणींतून मार्ग काढला. तो म्हणाला, 'मिया असं बोलूं नकोस. मित्रांमध्यें एकमेकाला दिलेले पैसे परत घेत नाहींत. मी तुम्हांला पैसे देईन पण तें कर्ज म्हणून तुम्ही समजतां कामा नये.'

●●●

['पॅक यंग जून' यांच्या कोरियन भाषेतील कथेचा अनुवाद]









*आपल्या कुलस्त्रीची अशी दयनीय विटंबना करण्यामध्यें या पतिबुवांना कोणता उद्देश साधावयाचा होता बरें? ज्या युधिष्ठिराचें अमर्षशून्य जन्तू असें वर्णन खुद्द द्रौपदीच यथार्थपणें अन्यत्र करते त्या युधिष्ठिराच्या बाबतींत काय अशक्य आहे बरें?*

# तूं असशील तशी सभेसमोर ये



एकवस्त्रा रजस्वला : १०

## तूं अर्धनग्न अवस्थेमधें सभेसमोर ये

**कौ**रवांच्या नांवावर जीं पातकें जमा आहेत त्यांत द्रौपदी-वस्त्रहरण हें एक महापातक होय. विकर्ण सोडून सारे कौरव या प्रसंगी नादानपणें वागले. भीष्म, द्रोण यांचीसुद्धां वर्तणूक यावेळीं निरपवादपणें निर्दोष अशी झाली नाहीं, हें सारें प्रथमच कबूल करून नंतर आपणास हेंही मान्य करावयास हवें कीं या महापातकांतील सिंहाचा भाग युधिष्ठिराचा आहे.

मानससरोवरींचा हंस तेथून उडून चिखलाच्या डबक्यांत जाऊन बसला व त्याच्या अंगावर तेथल्या बदकांनीं चिखल उडविला तर त्यत बदकांचा दोष अधिक कीं हंसाचा अधिक ! चिखल चिवडणें हा बदकांचा धर्म आहे. हंसानें आपली आपण काळजी घ्यावयास हवी. जारानें दार ठोठावूं नये अशी इच्छा असल्यास पतिव्रतेनें वेश्यांच्या वस्तींत राहून चालणार नाहीं. कौरव हे बोलून चालून सत्तांध अधम पुरुष आहेत. त्यानीं अधमता केली याचा दोष त्यांना देण्याच्या अगोदर त्यांच्याकडून सद्वर्तनाची अपेक्षा करण्याच्या आपल्या अव्यवहारीपणाबद्दल आपला आपणास दोष द्यावयास नको काय !

तेव्हां इथें युधिष्ठिराच्या वर्तनाचीच छाननी करणें आहे. शिष्ट समाजामध्यें स्त्रियांचें पावित्र्य

आणि त्यांची विशिष्ट परिस्थिति यांचा आदर करणें हा सनातन धर्म होय. स्त्रियांच्या रजस्वला अवस्थेची विटंबना करणें ही हीनपणाची परमावधी होय. द्रौपदीची जी अशी विटंबना झाली तेवढ्याचाच इथें विचार कर्तव्य आहे.

रजस्वला द्रौपदीला नग्न करावयास प्रोत्साहन देतांना कर्ण म्हणतो, 'धर्मानें स्त्रीला एकच पति मान्य केला असतां जी पांच पुरुषांना भोग देते ती वेश्याच होय. वेश्येला सभेंत खेचणें यांत कांहीं गैर नाहीं. ती एकवस्त्रा असली अथवा विवस्त्रा असली तरी कांहीं बिघडत नाहीं.

यापूर्वी द्रौपदीला सभेंत खेंचतांना दुःशासन म्हणतो, 'द्रौपदी तूं एकवस्त्रा अस, विवस्त्रा अस वा रजस्वला अस. तूं दासी असल्यानें आम्ही म्हणूं तसेंच तुझें वस्त्र राहील.'

महाभारताचे सर्व टीकाकार, संक्षेपकार, भाष्यकार हे उद्गार अत्यंत हीन आहेत हें एकमुखें मान्य करतात. परंतु त्याहूनही अनेक पटीनें हीन असे जे उद्गार, प्रत्यक्ष युधिष्ठिरानें कर्ण व दुःशासन यांच्या आधीं काढलेले आहेत त्याच्याकडे सोईस्करपणें दुर्लक्ष करण्याची या टीकाकारांची, भाष्यकारांची वृत्ति पक्षपाती, म्हणून गर्ह्य होय.

द्रौपदीला सभेंत बोलाविण्यास पहिल्यांदा दूत जातो तेव्हां ती त्याच्या मुखानें सभेला अवाक करणारा प्रश्न विचारते, "धर्म स्वतः दास झाल्यावर मला पणास लावण्याचा त्याला अधिकार काय ? हे धर्मज्ञ, नीतीज्ञ आणि श्रेष्ठ सभाजन हो, आपली आज्ञा काय आहे ? आपली आज्ञा असेल तसें मी वागेन."

त्या अत्यंत बुद्धिमति स्त्रीचा हा धर्माचा सूक्ष्म कीस काढणारा प्रश्न ऐकून भीष्मादि मोठमोठे न्यायपंडित चूप बसतात. आपल्या हातून अन्याय्य आणि अधार्मिक वर्तणूक घडली असल्याची त्या प्रश्नांत प्रत्यक्ष पत्नीनें केलेली सूचना ध्यानांत येतांच युधिष्ठिर, यावेळीं त्याला विचारलें नसतांही, उगाच आपलें मौन सोडून पुढील उत्तर देतो,

> एकवस्त्रा त्वधोनीवी रोदमाना रजस्वला
> सभामागम्य पांचाळी श्वसुरस्याग्रतो भव ॥
> अथ त्वामागतां दृष्ट्वा राजपुत्रीम् सभां तदा
> सभ्या सर्वे विनिंदेरन् मनोभिर्धृतराष्ट्रजम् ॥सभा। ६७। १९-२०।

भाष्यकार जसे कटाक्षानें हे श्लोक टाळतात तसेच भाषांतरकार यांचें भाषांतर करतांना त्यांत पदरचे शब्द घालून त्याच्या अर्थाचें स्वरूप बदलावयाचा प्रयत्न करतात. पदरचे शब्द न घालतां याचा अर्थ पुढीलप्रमाणें होतो, 'हे पांचाळी, एकच वस्त्र नेसलेली, त्याचीही गांठ सुटलेली, रडणारी आणि विटाळशी अशी तूं सभेंत येऊन सासऱ्यांपुढें उभी रहा. तूं राजपुत्री अशी सभेंत आल्यावर हे शिष्ट लोक मनातून धृतराष्ट्राच्या पुत्राची निंदा करतील.'

यावेळीं असा प्रश्न आहे कीं प्रत्यक्ष युधिष्ठिरानें जर आपल्या पत्नीला अर्धनग्न आणि रजस्वला अशा अवस्थेमध्यें सभेंत उभें रहावयास सांगितलें तर चांडाळांना तिला पूर्ण नग्न करण्याची स्फूर्ती झाल्यास तो त्यांचा दोष काय ? गृहलक्ष्मीचा मान पति राखील तेवढाच जास्तींत जास्त चांडाळ राखील. प्रत्यक्ष पतीनें जर पत्नीच्या नाजूक अवस्थेची बूज राखली नाहीं तर चांडाळ त्याच्या पुढची पायरी गांठावयास कमी करणार नाहींत. द्रौपदीचें वस्त्रहरण करण्याची आणि तिच्या रजस्वला अवस्थेचा उच्चार करण्याची प्रेरणा आणि धीर पाजी लोकांना युधिष्ठिर धर्माच्या वरील पांडित्यावरून प्राप्त झालेला नाहीं असें कोण म्हणेल ?

पुढें आणखी किंचित विवेचन करावयाचें आहे. त्यासाठीं द्रौपदी माउलीची आणि मायबहिणी वाचकांची क्षमा मागून महाभारतकालीन एक नाजुक गोष्ट लिहितों. त्याकालीं रजस्वला स्त्रिया वस्त्रांच्या घड्या घेत नसत. द्रौपदीचें वस्त्र रुधिरानें लपथपलें होतें असे उद्गार विदुरासारख्या संतानें स्पष्टपणें आणि पुन्हां पुन्हां काढलेले आहेत.

भाषांतरकार या श्लोकांचे भाषांतर करतांना 'जशी असशील तशी' असे पदरचे शब्द घालतात. त्यामुळें असें अर्थांतर होतें कीं द्रौपदी रजस्वला आहे कीं नाहीं, एकवस्त्रा आहे कीं नाहीं, हें युधिष्ठिरास माहीत नव्हतें. परंतु हा बचाव लंगडा आहे. कारण जिथें वाक्यार्थ स्पष्ट असेल तिथें पदरचे शब्द घालावयास मुभा नाहीं. नाहींतर वाटेल तिथें वाटेल तो पदरचे शब्द घालील.

**श्री. आत्माराम निळकण्ठ**

तेव्हां हे पदरचे शब्द गाळून जे महाभयंकर वाक्य उरते त्याचा अर्थ काय बरें ? आपल्या बायकोचें रक्तानें भरलेलें वस्त्र सभेसमोर मिरवून युधिष्ठिराला सभ्यांच्या मनांत दया उत्पन्न करावयाची होती काय ? आपल्या कुलस्त्रीची अशी दयनीय विटंबना करण्यामध्यें या पतिबुवांना कोणता उद्देश साधावयाचा होता बरें? ज्या युधिष्ठिराचें अमर्षशून्य जन्तू असें वर्णन खुद्द द्रौपदीच यथार्थपणें अन्यत्र करते त्या युधिष्ठिराच्या बाबतींत काय अशक्य आहे बरें ?

पदरचे शब्द घालून जें भाषांतर होतें त्यानेही धर्माच्या चरित्रास मोठा तेजाळ उजाळा येतो असें नाहीं. बायकोनें नवऱ्याचें शहाणपण काढावें हें अहंमन्य नवऱ्यांना आवडत नाहीं. द्रौपदीनें अडचणीत टाकणार प्रश्न विचारून त्याचा मूर्खपणा सूचित केल्यामुळें युधिष्ठिर संतापून बेताल झाला आणि मनाला आलें ते बडबडला असा त्याचा अर्थ होतो. बेताल न झालेला कोणता नवरा आपल्या पत्नीस 'नागवी असलीस तरी तशींच ये, रजस्वला असलीस तरी तशीच ये' असा निरोप धाडील ?

लाचारी असो वा बेतालपणा असो. युधिष्ठिराच्या उद्गारांची हीनता आणि अभद्रता कायम आहे. स्वर्गंगेच्या पाण्यांत त्रिजन्म धुवूनही ती अमंगलता जाणार नाहीं. द्रौपदीच्या रक्तानें भिजलेल्या वस्त्रांचा जो घोर अपमान सभेंत झाला, त्याचें प्रोत्साहन आणि प्रेरणा चांडाळ कौरवांस देण्याचें जें दुष्कर्म या उद्गारांनी केलें, त्याचें युधिष्ठिराच्या मुखास लडबडलेलें वज्रलेप काजळ किती धुतलें तरी जाईल काय !

## नेदं लोभान्न चाज्ञानात् : ११

## लोभी तूं आहेस–अडाणी तूं आहेस

भारतांतील एक छोटासा संवाद युधिष्ठिर, भीम आणि कुंती यांच्या स्वभावावर फार सुंदर प्रकाश टाकतो. लाक्षागृहांतून पळालेले पांडव प्राणभयानें कौरवांपासून लपून एकचक्रा नगरीमध्यें एका ब्राह्मणाच्या घरीं रहात असतात. एके दिवशीं कुंती आणि भीम हेच घरामध्यें असतांना ब्राह्मणाच्या घरांतून शोकाचें रडणें ऐकूं येतें. पुष्कळ वेळ असें रडणें ऐकल्यावर कुंतीचें सदय हृदय मंथून निघतें आणि ती कल्याणमयी स्त्री भीमास म्हणते,







अनुक्रमणिका

"आपण या ब्राह्मणाच्या आधारानें सुखानें रहात आहोंत. इथें आपला एवढा सत्कार झाला आहे की क्षणभर आम्ही आपलें दुःख आणि दैन्य विसरून गेलेले आहोत. या ब्राह्मणाचे उतराई कसे होऊं शकूं याचा मी किती दिवस विचार करतें आहे. दुसऱ्यांपासून उपकृत झाल्यावर आपण त्यांचे उतराई होणें हा सज्जनांचा धर्म होय. उतराई झाल्यामुळें ज्यावर केलेले उपकार नष्ट होते नाहींत त्यालाच मनुष्य म्हणावयाचें. प्रत्युपकार हे नेहमीं उपकाराहून मोठे असावे हीच मानवता होय. भीमा, आपल्या उपकारकर्त्या या सज्जनावर कांहींतरी मोठें संकट आलें आहे. तुझ्या साह्यानें जर मी यावेळीं त्याला मदत करूं शकलें तर फार बरें होईल."

त्यावर भीम म्हणाला, 'आई, त्यावर संकट काय आलें आहे हें तूं विचार. तें कितीही दुष्कर असलें तरी मी तें निवारण करीन.'

या संवादाची परिणती भीमास बकासुराची हकीगत कळण्यांत होऊन तो बकासुराचें निवारण करावयास गेला. त्यानंतर युधिष्ठिर घरीं आल्यावर त्याला हें वर्तमान समजलें. तें ऐकून क्षणाचीही उसंत न घेतां तो म्हणाला,

'आई हें अत्यंत दुःखदायक आणि दुष्कर साहस तूं कां केलेस? आपल्या पुत्राला संकटांत घालणें याला शहाणपणा कोण म्हणेल ? दुसऱ्याच्या सुखासाठीं का तूं आपल्या पुत्राच्या जिवावर उठली आहेस ? मला वाटतें हें तुझें करणें लोकविरुद्ध आणि वेदविरुद्ध आहे. भीमाचा भरंवसा आहे म्हणून आपण सुखानें झोपत आहोंत, पुढें सुखाचे दिवस येतील अशी आशा करीत आहोंत. असें असतां त्याला संकटांत घालण्याचें दुष्कृत्य तूं कोणत्या दुर्बुद्धीनें केलें आहेस? अनेक दुःखें सोसून झाल्यामुळें का तुझ्या मनाचा तोल गेला आहे? तुझ्या बुद्धीला भ्रंश झाला आहे ?'

मातृभक्ति, भ्रातृप्रेम, निःस्वार्थता, कृतज्ञता, निर्लोभता इत्यादी धर्मसुलभ उदात्त गुणांवर लोकव्यवहार आणि वेद यांच्या आधारानें प्रखर प्रकाश पाडणारें युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून कुंती म्हणाली,

" युधिष्ठिरा, मी हें काम केलें आहे तें बुद्धीच्या दुबळेपणानें नव्हें. आपण या ब्राह्मणाच्या आश्रयानें सुखानें रहात आहोंत. आपल्या दुःखांचा आणि क्रोधाचा विसर पडावा एवढें सुख त्यानें आपणास दिलें आहे. त्याचे उतराई होण्याचा एवढाच मार्ग मला दिसत आहे. जो उपकार विसरत नाहीं तोच मनुष्य पदवीस पात्र होय. भीमाचें सामर्थ्य मला माहीत आहे आणि तुलाही माहीत आहे. मी जी गोष्ट केली आहे ती लोभामुळें नव्हे, मोहामुळें नव्हे किंवा अडाणीपणामुळें नव्हे. मी बुद्धिपूर्वक ही गोष्ट केलेली आहे."

या संवादांत धर्म आणि कुंती यांच्या स्वभावावर फारच उत्तम प्रकाश पडत आहे. कुंती आणि भीम यांच्या स्वभावाची राजस उदात्तता कोण मान्य करणार नाही ! पण युधिष्ठिराच्या स्वभावांतील चौरस क्षुद्रता मान्य करणें पारंपारिकांना जड जातें. ते म्हणतात की युधिष्ठिर भीमावरील प्रेमामुळें असें म्हणाला.

असें म्हणणें सोपें आहे पण मानणें कठीण आहे. हिडिंबवधामधें किंवा पुढेंही भारतीय युद्धांत जेव्हां जेव्हां भीम कठीण प्रसंगांत सांपडलेला आहे तेव्हां कधीही युधिष्टिर हत्यार उचलून त्याच्या मदतीस गेला नाहीं. तें काम नेहमी अर्जुन करतो. दुर्योधनाने. भीमास वीष चारलें आणि नदींत फेकून दिलें तेव्हा त्या गोष्टीची कल्पना आल्यावर धर्म जाब विचारण्यास मुळींच पुढें सरला नाहीं. उलट आपल्या जिवास भिऊन जणूं काहीं काहींच घडलें नाहीं असें दाखवित चोराप्रमाणें चूप बसला. युधिष्ठिराचें भीमावर प्रेम किती होतें हें समजण्यास यावरून हरकत येऊं नये.

युधिष्ठिरास मुख्य काळजी वाटत आहे ती भीम मेला तर आपणास सुखानें झोंप कशी मिळणार, सुखाचे दिवस कसे येणार, राज्य कोण मिळवून देणार याची. ही काळजी भीमाच्या प्रेमानें नव्हे हें उघड आहे. या लोभाचा आणि स्वार्थाचा उठाव झाल्यामुळें युद्धिष्ठिराचा क्षोभ होऊन तोल सुटला आहे. त्याचा मुखवटा गळून पितळ उघडें पडलें आहे. त्यामुळें तो मातेची बुद्धि विप्लुत झाली आहे आणि चित्त बहकलें आहे असे आरोप तिच्यावर करीत आहे. वस्तुतः त्याचीच बुद्धि विप्लुत झाली आहे, त्याचें चित्त बहकलें आहे आणि हें समजण्याचा तोल त्याला राहिलेला नाहीं.

कुंती धर्माला जें उत्तर देतें त्यांत ती त्याला स्पष्ट मूर्ख म्हणत नाहीं. पण ती म्हणते मी हें कर्म लोभानें केलेलें नाहीं, अज्ञानानें केलेलें नाहीं, मोहानें केलेलें नाहीं. युधिष्ठिरानें जो आक्षेप घेतला आहे तो कशामुळें घेतला आहे हें ती या उत्तरांत स्पष्टपणें सुचवीत आहे. युधिष्ठिरानें हा आक्षेप स्वार्थानें, मूर्खपणामुळें आणि मोहामुळें म्हणजे बुद्धिभ्रंशानें घेतला आहे.

## यौवराज्यें युधिष्ठिरः १२

## युधिष्ठिर युवराज झाला

कोणत्या एकाच व्यक्तीची कोणती एकच कृति न घडल्यानें भारतीय युद्धाची अनर्थ परंपरा टळूं शकली असती असा विचार केला असतां आपण युधिष्ठिराकडे येऊन पोहोंचतों. अंड्याला कोंबडी कारण की कोंबडीस अंडे कारण अशा वादाचा अंत कधीही लागत नाहीं हें खरें. पण शेवटीं परमेश्वराच्या हुंकारापासून कोंबडी अथवा अंडे एक कांहींतरी उत्पन्न झालें असें मानून ज्याप्रमाणें वादाचा शेवट करावा लागतो त्याचप्रमाणें भारतीय युद्धाच्या अनर्थांची कारणपरंपरा युधिष्ठिरानें आपणास युवराजाचा अभिषेक करून घेतला या घटनेकडे नेऊन थांबविणें श्रेयस्कर दिसतें.

हा अभिषेक झाला तेव्हांची परिस्थिती मोठी नाजुक होती. हस्तिनापूरच्या राज्याचा वारसा हें जें सर्व भांडणाचें कारण त्याची सविस्तर चर्चा अथवा समाधानकारक खुलासा, या अत्यंत आवश्यक अशा विषयावर महाभारतानें घातक मौन पाळलेलें आहे हें आपण पूर्वी पाहिलेलें आहे. कृष्णभक्ति आणि पांडवप्रीति या भागवत गुणांत गुंग झाल्यावर आपली प्रवृत्ति राज्य हें वडील शाखेंत चालावें ही सनातन परंपरा विसरून दुर्योधनास राज्याधिकार नाकारण्याकडे होते. परंतु धृतराष्ट्र आणि दुर्योधन हे आपणासारखे भागवत नसल्यानें आपणाशी सहमत होत नाहींत.

आपणास मुलें होणार नाहींत ही खात्री झाल्यावर पंडूचें लक्ष ऐहिक जीवनावरून उठलें आणि तो हस्तिनापूर सोडून वनवासी झाला. कारभाराचें संचलन पंडूकडून भीष्माकडे आल्यावर धृतराष्ट्राचा अंतरात्मा शांत होणें साहजिक होतें. कारण भीष्माची निःस्वार्थता निरपवाद होती. भीष्मास पुत्रही होण्याचा संभव नसल्यानें पुढचा मार्ग सरळ होता. अशाप्रकारें आकाश निरभ्र असतां कुंतीनें कोणत्यातरी उपायानें पंडूस पुत्रदान केलें






अनुक्रमणिका

आणि युधिष्ठिराच्या रूपानें भावी संकटाचा ढग क्षितिजावर डोकावला. अजून धृतराष्ट्रास स्वतःस पुत्र झालेला नव्हता. तोही दुर्योधन पुढच्या वर्षी जन्मला आणि प्रश्नाचें स्वरूप स्पष्ट झालें. दुर्योधनाच्या जन्मवार्तेच्या क्षणींच धृतराष्ट्रास प्रश्न पडला कीं आतां पुढील पिढीमध्यें हक्काचें राज्य आपल्या या पुत्रास मिळणार की पुन्हां ऐहिक जीवनांत लक्ष घालून आपल्या कर्तृत्वानें सत्ता उचलून युधिष्ठिराचें प्यादें पुढें आणणार ?

हा प्रश्न धृतराष्ट्रापुढें उभा राहिला तरी तो आपल्या पराधीनतेमुळें कांहींही करावयास असमर्थ होता. ही घोर शंका हृदय कुरतडत आहे, पंडूचें कांहीं दैवयोगानें निसंतान झाल्याची सुवार्ता कानीं येते कीं काय इकडे लक्ष लागलेलें आहे, पंडू सत्ताधीश असतां नाना कारणांनीं त्यास वश झालेले लोक आणि भीष्म–विदुरादि सज्जन यांच्या होस हो ठोकून वेळ मारून न्यावा लागत आहे अशा कष्टमय अगतिकतेंत धृतराष्ट्राचे हे दिवस गेले असणार. अशा परिस्थितींत पंधरा–सोळा वर्षें गेल्यावर पंडू वनांत मरण पावला व आपले आणि माद्रीचे असे पांच पुत्र घेऊन कुंती हस्तिनापुरांत हजर झाली. या बेवारशी मुलांना घरांत प्रवेशच मिळूं नये असा कसून प्रयत्न त्याचवेळीं झाला. पण दुर्योधन लहान होता. धृतराष्ट्र आंधळा होता. तेव्हां भीष्मापुढें कोणाचें कांहीं चाललें नाहीं.

भीष्माची गोष्टच वेगळी होती. त्याचा यथार्थ गुणगौरव गावयास इथें जागा नाहीं. पण स्वार्थ या नांवाचा कांहीं मनोधर्म असतो याची त्या महात्म्यास जाणीवही नव्हती. कशी असावी ? क्षणाचा विचार न करतां त्या सुपुत्रानें आपल्या पित्याच्या असमंजस सुखा-साठीं आपल्या सर्वस्वावर पाणी सोडलें होतें. आपद्धर्माच्या नांवाखाली प्रतिज्ञाभंगाचें पाप टाळून, पद्मिनीप्रमाणें सुंदर आणि तरुण अशा भावजयांचा कायदेशीर उपभोग घेण्याची आलेली सुसंधी, विनंतीरूप आज्ञा आणि करुणामय विनवण्या, याना धुडकावून त्यानें उधळून लाविली होती. आणि कुठच्यातरी कोळ्याच्या मुलीला कुठच्यातरी उतारूपासून कुमारी अवस्थेंत झालेल्या पुत्रापासून उत्पन्न झालेल्या धृतराष्ट्रास, आपलें हक्काचें राज्य बहाल करून टाकलें होतें. त्या योगिराजास धृतराष्ट्र आणि दुर्योधन यांच्या क्षुद्र मनांतील





वाढलें कशीं कळावीं ? खुद्द धृतराष्ट्राच्या अंगातील रक्त आपलें अथवा कुणाचें नाहीं याची ज्यानें तमा बाळगली नाहीं त्यानें युधिष्ठिराच्या अंगातील रक्त कुणाचें आहे या धृतराष्ट्राच्या विवंचनेची पत्राज काय म्हणून ठेवावी ? त्यामुळें पंडुपुत्रांचा कुरुकुलांत विनबोभाट प्रवेश झाला.

हा प्रवेश झाल्यावर आणखी एक गोष्ट आपोआप घडून आली. दुर्योधनाची राजपुत्र-सहज उच्छृंखलतों आणि युधिष्ठिरानें पुढें आमरण दाखविलेली "देवमाणूस" वृत्ती यांची तुलना होऊं लागली. आणि पंडूचे पक्षपाती असणाऱ्या लोकांकडून जाणूनबुजून आणि त्यांच्या गळीं लागणाऱ्या गतानुगतिकांकडून नकळतां असा युधिष्ठिर हा छान राजा होईल असा पद्धतशीर प्रचार चालू झाला.

भीष्माची राज्याची कल्पना त्याच्या थोर व्यक्तित्वास साजेशी होती. त्यांत राजाच्या सुखाचा भाग नसून प्रजेच्या सुखाचाच भाग होता. त्यामुळें त्याच्या कानीं येणाऱ्या लोकमताचाच त्याच्यावर परिणाम झाला. धृतराष्ट्रासही या प्रश्नाची कायदेशीर न्याय्यता विचारण्याचा धीर या मोक्याच्यावेळी लोकभयानें झाला नाहीं. आणि याची परिणती युधिष्ठिराला युवराज म्हणून अभिषेक करण्यांत झाली.

हें राजकारण इथेंच थांबलें नाहीं. आपली "देवमाणूस" वृत्ती उत्तम फलदायी होतें हें ओळखणाऱ्या युधिष्ठिरानें आपण 'गुणी बाळ' आहोत असें लोकमत बनविण्याचा कटाक्ष ठेवला. त्यामुळें धृतराष्ट्र जिवंत असतांच युधिष्ठिरास अभिषेक करावा हें लोकमत प्रगट होऊं लागलें. हें दुर्योधनाच्या कानीं पडतांच आतां हालचाल केलीच पाहिजे असा निर्णय त्यानें घेतला आणि भीष्माच्या नकळत पण धृतराष्ट्राच्या संमतीनें पांडवांस जिवंत जाळण्याचा बेत ठरवून तो आपल्या कल्पनेप्रमाणें पार पाडला.

भीष्माचार्य, रामचंद्र या आदरणीय सत्पुरुषांच्या वृत्तीमध्यें जो उदात्ततेचा घमघमाट दरवळत आहे त्याचा पुसटसाही स्पर्श युधिष्ठिरास झालेला असता तर वंशपरंपरेंत वडिलकीनें चालणारें हें राज्य दुर्योधनाच्या अधिक मालकीचें, आहे हें त्यानें सर्वांआधी आपणहून कबूल करावयास हवें होतें. (दुर्योधन बालपणीं हूड असला तरी पुढें उत्तम प्रकारचा राजा झाला व त्यानें प्रजेचें प्रेम संपादलें. भारतीय युद्धांत युधिष्ठिर आणि दुर्योधन याना पाठिंबा ७ : ११ या प्रमाणांत होता ही गोष्ट इथें विपर्यांतर करूनहि लिहितों ). तुझें राज्य भरतास दे असें कैकेयीनें म्हणतांच रामचंद्र म्हणाला, "माते, ये. दिलें" प्रत्यक्ष कैकेयीसही या उद्गारांनी धक्का बसला. तिनें शंका प्रदर्शित केली. तेव्हां रामचंद्र म्हणाला, "माते मी एकदांच बोलतों." कुठें ही वृत्ती आणि कुठें "नको–नको" म्हणत चहासाठीं हात पुढें करणाऱ्या पाहुण्याशीं तुलनीय अशी युधिष्ठिराची वृत्ती. युधिष्ठिराच्या राज्यविषयक स्वार्थावर जुगारी ईर्षेसारखा अधिक मोठा दुर्गुणच मात करूं शकला. पत्नीवरचें घोर संकटही मात करूं शकलें नाहीं हें आपण पाहिलेंच आहे. राज्य मिळतच नाहीं असें झालें तेव्हां तो पुढें पांच गांवावर उतरला ती केवळ भेकड लाचारी होय. त्यांत उदात्ततेचा अंशही नाहीं.

पुढें राज्यलाभ व्हावा म्हणून मुळापासूनच ढोंगी सात्विकता युधिष्ठिरानें धारण केली होती असें मी म्हणत नाहीं. कारण तेवढा स्पष्ट पुरावा नाहीं. परंतु अमर्यादहीन थंडपणाचा परिणाम म्हणून यौवराज्य चालून येत आहे असें दिसलें तेव्हां त्याने वहात्या गंगेंत हात धुवून घेतलेच. त्यावेळी त्यानें यौवराज्य नाकारलें असतें तर पुढची अनर्थपरंपरा टळली असती. धृतराष्ट्राच्या पिढींत जें विदुराचें स्थान होतें तें दुर्योधनाच्या राज्यांत युधिष्ठिराचे रहातें. त्यांत त्याला अन्याय नसल्यानें तक्रारीस जागा नव्हती. पुढें राज्यावर स्थिर झाल्यावर 'हें राज्य मला नको' असा कांगावा त्यानें अनेकवार करून दाखविला आहे त्याऐवजी आतां एकदांच तो हें यौवराज्य मला नको म्हणता तर मलें होतें. पुढें त्यानें असा कांगावा केला तेव्हां "टाक स्वराज्यच्या सनदा" असें म्हणूं शकणारा एकादा रामदास समोर नाहीं याची त्यानें खासच शहानिशा करून घेतली असणार.

●●●














# खाँ साहेब निसार हुसेन खाँ

खाँ साहेब निसार हुसेन खाँ हे गायनाचार्य रामकृष्णबुवा वझे, ग्वाल्हेरचे विख्यात संगीत शिरोमणी शंकरराव पंडित, श्री. भाऊराव जोशी, श्री. शंकरराव इरदगेकर इत्यादि ज्येष्ठ श्रेष्ठ महाराष्ट्रीय गवय्यांचे गुरू होत. विख्यात गायक हद्दूखाँ व हस्सूखाँ यांचे चुलत भाऊ नत्थेखाँ यांचे निसार हुसेनखाँ हे दत्तक पुत्र होत. नत्थेखाँ हे संगीत क्षेत्रांतील एक जाज्ज्व विद्वान समजले जात.

ग्वाल्हेरचे रसिकाग्रणी महाराज जयाजीराव यांनी आपल्या दरबारांत त्याकाळीं बडे महंमद खाँ, हद्दूखाँ यांसारखे अतिरथी गायक असतांना, त्यांना वगळून नत्थेखाँ यांनाच आपलें गुरु मानले होते, व त्यांच्याशी परंपरेप्रमाणें गंडाहि बांधला होता. नत्थेखाँ होतेहि तसेंच धौम्यासारख्या वृत्तीचे. आधीं ते शिष्याची परीक्षा घेत. तो कसोटीला उतरतो की नाहीं हें पहात आणि जो कसोटीला उतरे त्यालाच ते विद्या देत असत. राजगुरूचा मान ज्या इतमानानें ठेवला पाहिजे, त्या इतमामानें महाराज नत्थेखाँना वागवित असत. नत्थेखाँ दरबारांत येतांना हत्तीवर बसून येत. हा हत्ती त्यांना खास महाराजांनी दिला होता. आणि त्याचा सर्व खर्च राजकोषाकडूनच दिला जाई.

एकदां ग्वाल्हेर दरबारांत झालेल्या एका खास मैफलींत बाहेरून आलेल्या एका पाहुण्या गायकानें असा रंग जमविला कीं, आधीं गाऊन गेलेले ग्वाल्हेर दरबारचे सर्व गायक निष्प्रभ ठरले. त्यांच्या मागून बसणारा गायक तेवढ्याच तोलाचा, तसाच तो चतुर आणि मुख्य म्हणजे 'काळजाचा' हवा होता. अशा वेळी नत्थे खाँसाहेब पुढें झाले आणि आधला सर्व रंग पुसून टाकून एका नव्या नेत्रदीपक रंगाची उधळण त्यांनीं सर्व दरबारभर केली. ग्वाल्हेरच्या परंपरेचें नांव राखलें आणि महाराजांना प्रसन्न करून घेतले.

प्रसन्न झालेले महाराज 'चाहेल ते माग' म्हणाले. नत्थे खाँ गोंधळले. परमेश्वराजवळदेखील ज्यांनी एका गाण्याशिवाय दुसरें कांहीं मागितले नाहीं आणि गाण्याहून अधिक मूल्यवान असें या जगांत दुसरें कांहीं असूं शकेल याची त्यांना कधी कल्पनाच नव्हती, ते महाराजांनी 'माग' असें म्हटल्यावर काय मागणार कपाळ ? त्यांना काय मागावें हें कळेना. नाहीं म्हणायला चांदीचा रुपया हा फार मोठी गोष्ट आहे आणि खूपसे चांदीचे रुपये असणाऱ्या माणसाला श्रीमंत म्हणतात ही आपली त्यांची एक कल्पना होती. तेव्हां रुपये मागायच्या ऐवजीं त्याहून भव्य असें कांहीं मागायचें म्हणून नत्थे खाँ म्हणाले—'सरकार, मला खूपशीं चांदीची भांडीं द्या !' बरोबरीचे गवय्ये म्हणाले—'वेडा रे वेडा ! अरे मागून मागून काय मागितलेंस ? तर चांदीचीं भांडीं ?'

पण महाराज त्यांना गुरु मानीत होते. नत्थे खाँच्या वृत्तीची त्यांना पूर्ण कल्पना होती. त्यांनी त्यांना खूपशी चांदीची भांडीं तर पाठविलीच; पण एखाद्या जहागिरदाराला शोभेल असा त्यांचा इतमाम ठेवला.

नत्थे खाँ धर्मानें मुसलमान असून ब्राह्मणासारखे राहात. ते मुंडन करून कपाळाला गंध लावीत. धोतर नेसत. वेषहि ब्राह्मणासारखाच करीत. ते भजनें उत्तम म्हणत असत, आणि कथा-कीर्तनांना नियमितपणें हजर राहात.

अशा ह्या अत्यंत मनमिळावू विद्वान माणसाची शिष्यपरंपरा फार मोठी होती. पण त्याला संतान नव्हतें. आपली विद्या, आपलें नांव, आपलें घराणें हें सारें शाश्वत कसें राहील हीच एक चिंता त्यांना ग्रासूं लागली. अखेर महाराजांच्या सल्ल्यानें गाण्याची आवड असलेला आपल्या कुळांतलाच एक मुलगा त्यांनी दत्तक घेतला. त्यानेंच नांव निसार हुसेन खाँ.

वयाच्या बाराव्या वर्षापासून त्यांनी त्याला तालीम द्यायला सुरुवात केली. आपल्या खानदानाची (ज्याला 'ग्वाल्हेर घराणें' असें म्हणतात) खास अशी गायकी आस्ते आस्ते त्यांच्यात मुरूं देऊन वयाच्या एकविसाव्या वर्षी त्याला पूर्णपणें तयार केला. त्यानंतर एकदां महाराजांनी विचारलें—'उस्ताद, तुमचा मुलगा गाण्यांत तयार झाला कीं नाहीं ?' त्यावर नत्थे खाँ म्हणाले, 'हां ! आतांशा त्याला कुठं समज येऊं लागलेला आहे. पण महाराज, त्याचं पहिलं गाणं मी तुम्हालाच ऐकवीन आणि मग बाहेर गायची त्याला परवानगी देईन !'

महाराजांशीं झालेल्या या संभाषणानंतर मात्र मुलावर कडीं नजर ठेवून नत्थेखाँनी त्याला विशेष मेहनत करायला लावली. मध्यरात्रीं एक वाजतां ते त्याला रियाजला बसवीत व सूर्योदय झाल्यावर तानपुरा खालीं ठेवायची परवानगी देत. अशींच आणखी तीन वर्षे गेली आणि एका सुप्रभातीं—दरबारी पोषाखांत—हत्तीवर बसून बापलेक राज महालाकडे आले. महाराज जयाजीराव नुकतेच देवपूजेची तयारी करीत होते. खाँसाहेब आल्याची वर्दी मिळतांच त्यांनीं त्यांना आंत घेऊन यायला सांगितलें.

'उस्ताद आज सकाळींच कुठें ? गांवाला जायची परवानगी मागायला आलांत काय ?'

'नाहीं महाराज, मी आपल्याकडेच आलों

गोपालकृष्ण भोबे

*भारतीय संगीताच्या इतिहासांत अनेक थोर महापुरुष होऊन गेले. त्यांची साधनाहि अचाट आणि कृतीहि अचाट. त्या सिद्ध पुरुषांचीं चरित्रें सांगावीं, त्यांचें पुण्यस्मरण करावें एवढाच हें लिहिण्यामागचा हेतु.*

*त्यांच्या आयुष्यांतील या घटना ठिकाठिकाणी विखुरलेल्या आहेत. एकाद्या मैफलींत जुना जाणिता असा एखादा कलासक्त माणूस भेटतो. भावना चेतल्यामुळें तो एखादी जुनी आठवण सांगतो. अशा खूप आठवणीहि मीं ऐकल्या. त्यांतल्या कांहीं टिपून ठेवल्या, त्याच संकलित करून मांडीत आहे.*

होतो. आपली आज्ञा होत असेल तर निसार हुसेनचें गाणें आपल्याला ऐकवावं म्हणतों!'

'ठिक आहे, ऐकवा.'

ताबडतोब तंबोरे जुळले. साज तयार झाला. आणि साजाच्या स्वरांत आपला सूर एकजीव करून निसार हुसेन खाँनी भैरवी गायला सुरुवात केली. अस्ताई गायल्यानंतर 'करुणाकर माधव' ही भजनवजा चीज ते अशी गायले की, सारा दिवाणखाना त्या भैरवीच्या स्वरांनी व्यापून गेला. एका खान-दानी तपस्व्याच्या कृपेनें तयार झालेलें तरणे बांड रक्त तें. हजर असलेली खाजगींतली मंडळी थक्क झाली. दरबारला एक नवें रत्न लाभलें याबद्दल आनंदीत झाली. महाराजांना तर फार समाधान वाटलें. ते म्हणाले—'निसार वाहव्वा एवढ्या अल्पवयांत तू केलेली तयारी ऐकून मला समाधान वाटलें. तरीहि आणखी खूप रियाज कर! शिवाय तुझ्या ह्या वडिलांकडे दुर्लभ अशा कांहीं रागांचा व चिजांचा संग्रह आहे, तो संपूर्ण-पणें मिळव!'

महाराजांची परवानगी मिळाल्यानंतर नत्थे खाँनी निसारहुसेन खाँना मैफलींत गायची परवानगी दिली. दिवसेदिवस निसारहुसेन खाँसाहेबांची कीर्ती वाढूं लागली. खाँसाहेब नत्थे खाँचें नांव या मुलानें राखलें असे जाणते लोक म्हणूं लागले. पुढें नत्थे खाँच्या मृत्यूनंतर त्यांच्या जागीं दरबार गवयी म्हणून महाराजा जयाजीराजांनी निसार हुसेन खाँची नियुक्ति केली. आपल्या गुरूचा मुलगा शिवाय गुरुबंधू म्हणून वेतनाव्यतिरिक्त त्यांच्या कुटुं-बाचा सर्व खर्च सरकारी कोषांतून दिला जावा अशी महाराजांनीं आज्ञा दिली.

पूर्वीचे हे बहुतेक थोर कलावंत आपल्या कलेंत सम्राट होते. गाण्यांतले सर्व कायदे ते यथातथ्यपणें पाळीत असत; पण व्यवहारां-तल्या निर्बंधांची त्यांना किंचितहि जाणीव नसे. व्यवहारांत वागतांना ते अत्यंत स्वच्छंदी-पणानें वागत. त्यांचा लहर सांभाळणं म्हणजे मोठें दिव्य असे. त्यांचें सारेंच वागणें लोक-विलक्षण. नत्थे खाँसाहेबांना चांदीची भांडीं गोळा करायचा छंद तर त्यांचा मुलगा निसारहुसेन खाँ यांना रेल्वेत बसून प्रवास करायचा फारच शोक; परंतु रेल्वेंत बसून प्रवास करायला तिकिट वगैरे काढावें लागतें त्याला या गोष्टीची त्यांना अजिबात जाणीव नव्हती. एकदां कुणालाहि न सांगता तंबोरा काखोटीला मारून- थेट स्टेशनवर येऊन ते पहिल्या वर्गाच्या डब्यांत जाऊन बसले. कुठल्या तरी मधल्या स्टेशनवर तिकिट चेकरने त्यांना पकडले आणि खाली उतरविलें. त्यांच्याजवळचा तो तंबोरा वगैरे पाहिल्यानंतर त्या चेकरने म्हटलें "अहो थर्ड क्लासमध्यें तरी बसायचें, म्हणजे दंड तरी कमी झाला असता!"

त्यावर हे राजश्री म्हणतात, 'हम दरबारमें भी गद्दीपर बैठते हैं!'

त्यांच्या या उत्तरानें त्या चेकरला राग आला. त्याने रीतसर खटला भरून खाँसाहेबांना स्टेशनवर अटकवून ठेवलें. एवढें होईपर्यंत रात्रीचे दोन वाजले होते. खाँसाहेबांच्या नित्याच्या रियाजाची वेळ झाली होती. त्यांनीं ताबडतोब तंबोऱ्याची गवसणी सोडली आणि ते रियाजाला बसले. तपश्चर्येनें प्राप्त करून घेतलेल्या त्या गायकीचे स्वर जसजसे आसम-तांत घुमूं लागले तसतसे पुंगीच्या नादाने मुग्ध व्हावें तसे स्टेशनवरचे सर्व नोकर, गाडीतले सर्व लोक खाँसाहेबांच्याभोंवती हळूहळूं जमा झाले. सिग्नल देणारा, इशारा देणारा, स्टेशनमास्तर, रेल्वे पुलीस सर्वांच्या-सर्व खाँसाहेबांच्या भोंवती उभे राहून गाणें ऐकतां ऐकतां सगळे कांहीं विसरले. थोड्याच वेळांत भानावर येऊन सर्व चौकशी झाली आणि स्टेशनमास्तरांच्या खास परवानगीने खाँसाहेबांची पुढील प्रवासाची व्यवस्था करण्यांत आली.

महाराज जयाजीरावांच्या मृत्युनंतर ग्वाल्हेरच्या पंच कमिटीनें दरबारचा खर्च कमी करावा म्हणून खाँसाहेबांना वेतनाव्यतिरिक्त मिळणारा सर्व खर्च बंद केला. त्यामुळें चिडून जाऊन खाँसाहेबांनी दरबारची नोकरी सोडली आणि ते श्री. विष्णु पंडितांकडे आले. आपल्या मुलांना निसार हुसेन खाँनी शिक-वावे अशी विष्णु पंडितांची फार इच्छा होती; परंतु या थोर दरबार गायकाला तशी स्पष्ट विनंति करायचें धाडस त्यांना तोंपर्यंत झालें नव्हतें. खाँसाहेब असे एकाएकीं आपल्याकडे आल्याचें पाहून त्यांनाहि आश्चर्य वाटलें. दिवसभर त्यांची मर्जी राखून सायंकाळीं त्यांनी हळूच विषय काढला. नम्रपणें तशी विनंतीहि केली. खाँसाहेब म्हणाले, कीं 'मी दरबारची नोकरी सोडून इथेंच राहायला आलों आहे. आजपासूनच शंकरला तालीम द्यायला सुरुवात करतो.' विष्णु पंडितांचा आनंद गगनांत मावेना. आपल्या घरीं कामधेनूच चालत आली असें त्यांना वाटलें. त्यांनी शंकरला बोलावून खाँसाहेबांच्या ओटींत घातलें. पं. शंकरराव-जींना खाँसाहेबांनी सतत पांच वर्षें तालीम दिली. आपलें संपूर्ण विद्याभांडार त्यांनी शंकररावजींसमोर खुलें केलें. शंकररावजींनीहि आपल्या गुरूची सेवा एकनिष्ठपणें केली. पूर्वीपेक्षां आपल्या राहाणींत कांहीं फरक झाला, असें खाँसाहेबांना कधींहि वाटलें नाहीं. वृद्धापकाळीं खाँसाहेब आपल्या स्नेह्यांना सांगायचे, कीं—'माझं जवानीतलं गाणं तुम्हांला ऐकायचं असेल तर शंकरला ऐका. पडद्याच्या बाहेर उभं राहून ऐकाल तर तुम्हांला आम्हां दोघांतला फरक देखील सांगतां येणार नाही.'

निसार हुसेन खाँचें ब्राह्मण मुलांवर विशेष प्रेम असे. त्यांच्या शिष्यपरिवारात ब्राह्मणा-भरणा अधिक आहे. स्वतःला ते ब्राह्म म्हणवित असत आणि आपले नाव 'सुल्तान भट' आहे असें सांगत. गळयातला सहा जानव्यांचा जोड सर्वांना दिसावा म्हणून केवळ धोतर नेसून उघडेबंबहि हिंडत आणि एखादा

( पान ६६ वर )










वाचकांना अडलेल्या चमत्कारिक प्रश्नांना उत्स्फूर्त उत्तरें देण्यासाठीं प्रस्तुत सदराची योजना सुरू झाली आहे. मराठी साहित्यांतले एक अष्टपैलू लेखक वाचकांकडून येणाऱ्या प्रश्नांस उत्तर देण्यास सिद्ध जाहले आहेत. मात्र ह्या शरसंधानामुळें वर्मी घाव बसल्यास त्याचें पाप माथीं नको म्हणून तूर्त अनामिक अवस्थेंतच त्यांनी हें कार्य पत्करलें आहे. वाचकांनीं आपले सुबोध प्रश्न सुवाच्च अक्षरांत लिहून पाठवावे. अवाच्य प्रश्नांना उत्तरें दिलीं जाणार नाहींत.

श्री. **रतिकांत चाचड**, मुलुंड.

**प्रश्न : प्रार्थना करणाऱ्या ओठांपेक्षां मदत देणारे हात अधिक पवित्र असतात काय ?**

**उत्तर :** आजच्या जाहिरातीच्या युगांत बोलके ओठ गुप्तदानी हातांपेक्षां जास्त पात्र ठरतात. हाच जगाचा पवित्रा !

**प्रश्न : स्त्रियांना आवडणाऱ्या तीन गोष्टी कोणत्या ?**

**उत्तर :** आरसा, बारसा आणि अनरसा.

श्री. **अनिलकुमार देशपांडे**, वाई.

**प्रश्न : उत्कृष्ट वक्ता कोण असूं शकतो–विवाहित पुरुष कीं ब्रम्हचारी ?**

**उत्तर :** ब्रम्हचारी. कारण विवाहित पुरुषाला तोंड उघडण्याची संधीच कधीं येत नाहीं.

**प्रश्न : घोरण्याची संवय माणसाला कशी लागते ?**

**उत्तर :** आदिमानव कालांत जंगलांत निजणाऱ्या माणसानें श्वापदांना घाबरवण्यासाठीं शोधून काढलेली ही घोरण्याची क्लृप्ति त्याला अजूनहि सोडून जात नाहीं ह्यावरून मानव अजून पूर्णपणें सुधारलेला नसावा असें वाटतें.

**प्रश्न : दररोज सकाळीं कोणती गोष्ट पहिली करावी ?**

**उत्तर :** आधीं उठावें मग सर्व गोष्टी आपोआप होतात.

**प्रश्न : स्त्री व इस्त्री ह्यांत फरक काय ?**

**उत्तर :** स्त्री 'ऑटोमॅटिक' चालते. इस्त्रीला इलेक्ट्रिक लागते.

श्री. **भैरव रवळनाथ कानविंदे**, कुडाळ.

**प्रश्न : 'प्रेमाचें वैशिष्ट्य त्यागांत आहे' तें कसें ?**

**उत्तर :** कारण प्रेम अखेरीस प्रेमिकांना सोडून जातें म्हणून.

**प्रश्न : जो कधीं दान देत नाहीं त्याला काय म्हणाल ?**

**उत्तर :** नादान.

**प्रश्न : कादंबरींतला नायक खऱ्या नायकापेक्षां निराळा कां वाटतो ?**

**उत्तर :** सत्य हें साहित्यापेक्षां निराळें असतें म्हणून.

**प्रश्न : अलिकडे पुरुष मिशा कां ठेवतात ?**

**उत्तर :** पौरुषत्वाच्या मिषाखाली मिरवावें म्हणून.

**प्रश्न : स्त्री केव्हां बदलत नाहीं ?**

**उत्तर :** ती जेव्हां आरशांत पहात असते तोपर्यंत.

श्री. **माणिक वायंगणकर**, दादर.

**प्रश्न : अलिकडे सर्व व्यवसायांत चळवळी करून आपापल्या पोळीवर तूप ओढून घेण्याची प्रवृत्ति दिसते नाहीं कां ?**

**उत्तर :** भिक्षुकीच्या व्यवसायांत चळवळ न करतांही पुरण पोळीवर तूप मिळूं शकते.

**प्रश्न : 'पानी तेरा रंग कैसा' ?**

**उत्तर :** अंदर मैला जितना वैसा !

**प्रश्न : धार्मिक एकात्मकतेसाठीं कोणता ग्रंथ उपयोगी पडतो ?**

**उत्तर :** बँक बुक.

**प्रश्न : फलज्योतिष अधिक किफायतशीर कीं हस्तसामुद्रिक ?**

**उत्तर :** गिऱ्हाईक पुरुष असल्यास फलज्योतिष व स्त्री असल्यास हस्तसामुद्रिक दुहेरी फायद्याचे ठरतें.

कु. **अमला शारंगपाणी**, बडोदें

**प्रश्न : संस्थानें विलीन झाल्यामुळें संस्थानिकांना स्थान उरलें नाहीं. त्यांनी कुठें जावें ?**

**उत्तर :** प्राणिसंग्रहालयांत – एक ऐतिहासिक अवशेष म्हणून !

**प्रश्न : हल्लीं गहूं महाग, तांदूळ महाग, बटाटे महाग–मग आम्हीं काय खावें ?**

**उत्तर :** अखिल जीवनसत्वांनीं परिपूर्ण असलेली शेव उसळ.

• • •




- खाँ सा. विलायतखान
- केतकर मास्तर
- हें असं कसं झालं ?
- मोहनराव पालेकर
- नटसम्राट बालगंधर्व

## सत्यं, शिवं, सुंदरम

गेल्या महिन्यांत तीन थोर कलाचार्य गेले. गायनाचार्य खाँसाहेब विलायतखाँ, श्री मोहनराव पालेकर व चित्रकार श्री. कृष्णराव केतकर तिघांचेहि आत्मे पंचमहाभूतांत विलीन झाले; परंतु कीर्तिरूपाने तिघेहि जिवंत राहिले. शेवटचा श्वास तिघांनी अत्यंत समाधानाने सोडलेला असावा.

### खाँ. सा. विलायतखान

आग्रा घराण्याचे नांव चिरस्थाई करणारे खाँ साहेब विलायतखाँ यांचा शिष्य परिवार फार मोठा आहे. ज्यांचा ज्यांचा त्यांनी शिष्य म्हणून स्वीकार केला त्या सर्वांचे आज कल्याण झालेलें आहे. आपल्या शिष्यावर प्राणापलीकडे प्रेम करणारा हा सद्गुरु शिष्यांच्या प्रपंचाची, त्यांच्या आरोग्याची त्याच्या बऱ्या वाईटाची सदैव काळजी वहात असे. महिन्या दोन महिन्यांनी ते सर्वांना पत्रें पाठवित. कुणाला मराठींतून कुणाला हिन्दींतून, कुणाला उर्दूतून अशीं त्यांची पत्रें येत. आपल्या गुरूचे वात्सल्यानें भरलेलें असें पत्र आलें कीं शिष्य त्याचें पारायण करीत. आल्या गेल्या मित्रमंडळीला वाचून दाखवीत आणि आंसू भरल्या डोळ्यांनी गुरूचे गुणानुवाद गात.

विलायतखाँ साहेबांची आयुष्याची शेवटची कांहीं वर्षें दिल्लींत गेलीं. दिल्लीच्या आकाशवाणी केंद्रावर ते संगीत सल्लागार म्हणून होते; पण वर्षांतून एकदां मुंबईत आले, कीं आपल्या सर्व शिष्यांना भेटत, त्यांची गाऱ्हाणी ऐकून घेत. त्यांना अडलेल्या गोष्टीचा निर्णय देत. लायकीच्या शिष्यांना जवळ बसवून नवा राग, नवी बंदीष सांगत सगळ्यांकडून एक सुरानें ती म्हणवून घेत. आणि सर्वांचा दुवा घेत निघून जात. प्रत्येकाला वाटे 'खाँसाहेबांनी आमच्याकडे यांवं माझी मिठभाकरी खाऊन मला पावन करावं !' शिष्याला असें वाटणें यासारखें गुरुचें महद्भाग्य आणखी दुसरें कोणतें ?

विलायतखाँ मुंबईत आले आणि गाण्याची आवड असलेल्या माणसाला त्यांनीं कान दिले, मन दिलें, मंत्रहि दिला. संगीत शास्त्राचें गुप्त भांडार सर्वांना खोलून दाखविलें, त्यांच्या गुणवत्तेबद्दल आमच्या सारख्यांनी काय सांगावे ? जिथे गजाननराव जोशी, जगन्नाथबुवा पुरोहित, या गायक तयार करणाऱ्या ख्यातनाम कलावंतांनी, सद्गुरु म्हणून त्यांना लोटांगण घालावं तिथें सामान्यांचा काय पाड ? एक मात्र खरें कीं संगीत विषयांतल्या कूटप्रश्नाचें निराकरण करणारा एक अधिकारी पुरुष आपल्यांतून गेला. आणि आग्रा घराण्याच्या आद्यपुरुषांतला शेवटचा आधारस्तंभ कोसळला.

### मोहनराव पालेकर

विलायतखाँसाहेब गेल्यानंतरच्या आठ दिवसांनीच श्री. मोहनराव पालेकरांचें देहावसान झालें. उनियारा घराण्याची अस्सल तालीम त्यांना मिळाली होती. अनवट रागाचा त्यांच्या जवळ भरपूर सांठा होता. राजकारण, समाजकारण, धर्मकारण अशा विषयांचें वाचनहि खूप होते. त्यांच्या गायकीचें वळण आत्मसात करणें ही गोष्ट कठीण होती. ती पचवायला आधींच तयार पण चिकाटीचे विद्यार्थी हवे होते. सुदैवानें असे कांहीं विद्यार्थी त्यांना मिळाले आणि कसलाहि आडपडदा न ठेवतां मोहनरावांनी त्यांना शिकविलें. आज हे सर्व शिष्य नामांकित गायक म्हणून मिरवितात.

मोहनरावांचा स्वभाव करारी आणि नेकीचा होता. क्षुल्लकशा अपमानानें चिडून जाऊन त्यांनी चांगल्या पगाराच्या नोकरीवर लाथ मारली; आणि आपल्या गुणांची कदर होईल अशा जागीं केवळ तुटपुंज्या पगारावर ते राहिले. पुढें आपल्या गुणांच्या जोरावर त्यांनी तिथेंच मानाचें स्थान मिळविलें.

संगीत क्षेत्रांतल्या बिकट वाटेचे मोहनराव हे वाटाडे होते. त्यांचे पूर्वायुष्य नाटक कंपनींत गेलें, पण परंतु नंतरच्या आयुष्यांत नाटकीपणाच्या कोणत्याहि खुणा त्यांच्यांत त्यांच्या परिचितांना दिसल्या नाहींत. मोहनराव नाटक कंपनींत गेले; पण येतांना संगीताचा एक अमोल आणि अद्भूत असा ठेवा घेऊन परत आले. गृहस्थाश्रम पत्करल्यानंतर त्यांनी नाटकाचे तोंडहि पाहिले नाहीं. फर्मास विडी हें त्यांचे एकुलतें एक व्यसन. आणि तेंहि अत्यंत जुनें व आवडतें; पण तें सोडायचें असें ठरविल्यावर निग्रही मोहनरावांनी एकदां जी त्याला सोडचिठी दिली ती आयुष्याच्या अखेरीपर्यंत. नटाचे 'प्रकार,' 'कानड्याचे' प्रकार आणि कांहीं अप्रचलित मिश्र रागिण्यांचा त्यांच्याजवळ अपूर्व संग्रह होता. त्यांचा आवाज हलका आणि मधुर होता. ते फार कमी वेळां गायले; पण त्यांची दुर्मिळ बैठक असली, कीं गाणें जाणणारे लोक पर्वणीचा योग मानीत.

मोहनरावच सांगायचे, कीं " नामा गानविद्या






ही कुणाची खानगी मालमत्ता नाहीं ती सर्वांची आहे. आपल्याला जें मिळालं ते हळूहळू दुसऱ्याला शिकवून या विद्येंत प्रत्येकानं शहाणं झालं पाहिजे. आपल्या घराण्याची विद्या जतन केली पाहिजे ! ”

### केतकर मास्तर

‘ चित्रकला ही सर्व कलांची माता आहे ’ ही घोषणा केतकर मास्तरांनी सतत केली. केतकर कलाकार होते तसेच ते कलाकारांचे निर्माते होते. त्यांचे भाग्य असें कीं ज्या ज्या विद्यार्थ्यांना त्यांच्या कृपेचा स्पर्श झाला ते ते सर्व विद्यार्थी केवळ भारत वर्षांतच नव्हे तर अलम दुनियेंत ख्यातनाम झाले. केतकर मास्तरांचे अंतःकरण सदय होतें. गरीब पण होतकरू विद्यार्थ्याला त्यांच्याकडून मिळणारें उत्तेजन वरदानासारखें असे. स्वतः त्यांनी अठराविश्वे दारिद्र्याचे दिवस पाहिले होते. गरिबांची दुःखें त्यांना कळत असत. खरी कला ही गरिबांच्यापोटींच जन्म घेते हें ब्रीदवाक्य त्याना आकळले होतें. त्यामुळें ध्येयनिष्ठ विद्यार्थ्यांच्या अडचणी निवारून त्याला कार्यरत करण्याकडे त्यांचा ओढा विशेष असे. आणि म्हणूनच केतकरांचे शिष्य केतकरांचे नांव अमर करते झाले.

आज त्यांच्या शिष्यांत प्राचार्य आहेत, आचार्य आहेत, अष्टपैलू आहेत तसेंच उत्तम व्यवसायीहि आहेत. अखेरच्या आयुष्यांत हें एक फार मोठें समाधान त्यांना लाभलें. आपल्या शिष्यांच्या कर्तबगारींत आनंद मानून त्यांच्या पूर्वायुष्यांतल्या आठवणी सांगतांना ते रंगून जात. आणि इतरांनाहि रंगवीत. चित्रकलेप्रमाणें वाङ्मयांतहि त्यांनी विहार केलेला होता. कांहीं गोष्टी कांहीं नैबंधिक व कांहीं कविताहि त्यांनीं लिहिल्या. तत्कालिन नियतकालिकांत त्या छापूनहि आल्या होत्या.

केतकर मास्तर हे आपल्या गुरुजनांना देवतास्वरूप मानणाऱ्या पिढींतले होते. धुरंधर मास्तरांबद्दल त्यांना असीम आदर होता. आपल्या आयुष्यांत त्यांनी स्वतःचें घर बांधले आणि आपलीं मुलेंबाळें योग्य मार्गाला लागलेलीं पाहिलीं. याहून अधिक समाधानाचे निःश्वास आपल्या शिष्यांनी गांठलेलें उत्तुंग शिखर पाहून ते सोडायचे. आणि खऱ्या निर्मात्याला अधिक आनंदाचा क्षण तो कोणता ? केतकर मास्तर गेले; पण एक थोर परंपरा, थोर आदर्श आपल्या मागें ठेवून गेले.

**—गोपालन्**

### नटसम्राट बालगंधर्व

गेल्या सत्तावीस तारखेस पुणें येथें नटसम्राट बालगंधर्वांचा अमृतमहोत्सव पुणें विद्यापीठाचे माजी कुलगुरू रँगलर रघुनाथराव परांजपे यांच्या अध्यक्षतेखालीं भरगच्च उपस्थितींत मोठ्या थाटामाटानें साजरा झाला. पुणें हें मराठी रंगभूमीचें माहेर असल्यामुळें व पुणेकरांच्या नाट्यप्रेमी व उत्साही रसिकवृत्तीची ख्याति असल्यामुळें प्रस्तुत महोत्सव पुण्यास साजरा झाला हें उचितच झालें. शंभरसवाशें पुष्पहार ह्या गुणी कलावंताला अर्पण करून त्यांनी आपली कृतज्ञता व्यक्त केली हें उचितच झालें.

पंचाहत्तर वर्षं वयाचा हा नटश्रेष्ठ आज अपंग असूनहि नाट्य सेवेचा उत्साह अजूनहि दुर्दमनीय आहे हें त्यांनीं नवीन नाट्यसंस्था स्थापून तिच्याद्वारें जुनीं संगीत नाटकें पुनरुज्जिवित करण्याच्या सोडलेल्या संकल्पाद्वारें प्रतीत झालें आहे. त्यांच्या ऐन उमेदींत त्यांच्या रंगभूमीवरच्या वागणुकीची व वेषभूषेची सहीसही नक्कल समाजातल्या सुसंस्कृत स्त्रीवर्गाकडून होत असे हें जाणून त्यांनीं अत्यंत जबाबदारीनें आपलें वर्तन राखलें व छचोरपणाला व अवास्तव उत्तान शृंगाराला रंगभूमीवरसुद्धां थारा न देऊन व उत्कट गौरवप्रसंगीहि आपला तोल सांभाळून मराठी रंगभूमीला व समाजाला अनिष्ठ प्रवृत्तींकडे झुकूं दिलें नाहीं हा त्यांचा विशेष गुण होय. नाट्यसंगीतांत शब्द, अर्थ व स्वर ह्यांचा रसपूर्ण मिलाफ आणि विलास दाखविणारा त्यांच्यासारखा कलावंत मराठी रंगभूमीवरच नव्हे भारतीय रंगभूमीवरहि विरळा आहे असें म्हणणें अतिशयोक्त ठरणार नाहीं. मराठी रंगभूमीवर अविरत अर्धशतक आपली लोकप्रियता त्यांनीं सांभाळली ह्याचें कारण त्यांच्या ठायीं असलेला ध्येयाचा ध्यास व जबाबदारीची जाणीव. गणपतराव बोडस, मास्टर कृष्णराव, पंढरपूरकरबुवा, विनायकराव पटवर्धन इत्यादिकांच्या संगीत व नाट्यगुणांचा त्यांनीं कधीही दुस्वास केला नाही. उलट त्यांच्या वैशिष्ट्यांना रसिकतेनें व गुणग्राहकतेनें प्रोत्साहन देऊन त्यांना गौरव केला व अनेक प्रसंगीं कृतज्ञताहि व्यक्त केली.

ज्यानें रंगभूमीला उत्तुंग वैभव दाखविलें त्या ह्या गुणी नटाला उतारवयांत हलाखीची परिस्थिती आली ही घटना दुर्दैवी आहे. बालगंधर्वांना अपंग परिस्थितींत अजूनहि उमेद आहे, ईर्षा आहे. रंगभूमीवरचें संगीत आज नष्ट झालें आहे ह्याची त्यांना खंत वाटते. रंगभूमीवरच्या आजच्या अवास्तव व परकी प्रयोगांनीं समाजाला अनिष्ट वळण लागत आहे ह्याबद्दल त्यांना दुःख होतें. त्यांचें स्मारक करण्यासाठीं त्यांच्या नांवानें नुसतें एखादें थिएटर बांधून त्यांत असल्या प्रयोगांचा संकर करण्यापेक्षां त्यांच्या अतृप्त आकांक्षांच्या परिपूर्तीसाठीं सार्वजनिक साह्यानें अगर सरकारी अनुदानानें त्यांच्या नेतृत्वाखालीं आणि मार्गदर्शनाखालीं रंगभूमी — संगीत रंगभूमी पुनरुज्जीवित करण्याचा प्रयत्न होणें इष्ट आहे. तरच ह्या गुणी कलावंताच्या नाट्यसेवेची कदर महाराष्ट्रानें केली असें ठरेल. पाश्चात्य देशांत असल्या उच्च कोटीच्या कलावंताची बूज फक्त मानमरातबानें व पदव्यानीं न राखतां त्यांच्या चरितार्थाची सोय देखील करण्याची जबाबदारी समाजानें व राज्यसत्तेनें उचलेली असते. बालगंधर्वांना दीर्घायुरारोग्य प्राप्त होऊन त्यांच्या आकांक्षा परिपूर्ण होवोत असें आम्ही चिंतितों.

**—सारस्वत**

## क्रीडा

### वल्ला क्या बात है !

पाकिस्ताननें इंग्लंडबरोबर ‘रबर’ गमावलें! पहिल्या तीन कसोटी सामन्यांपैकीं दोन तर तीन दिवसांत संपले! खरं? अगदी खरं! कसं शक्य आहे हे! मागें तीन दिवसाचे कसोटी सामने ठेवावें असं सुचविल्याबरोबर फाझल व करदार किती क्रुद्ध झाले होते! मग त्यांचे खेळाडू ह्या वर्षी तीन दिवसांत कसोटी सामना कसा ‘ संपवू ’ शकलें ? कोणी जादू केली ही ? ट्रुमन-स्टॅथमनें गोलंदाजी टाकून आणि हनीफ–सयीदने फलंदाजी न करून !! ह्यामुळें पाकिस्तान संघाने दणकून पराभव खाल्ला. पहिला कसोटी सामना ते १ डाव २४ धावांनी हरलें हा पराभव मामुली वाटल्यामुळे ‘देखेंगे’च्या सुरांत त्यांनी दुसऱ्या कसोटी सामन्यांत लढत दिली. ह्यामुळें मियाभाई जरा ‘बच गये’ व फक्त ९ विकेटसनी मारा खाल्ला. ‘कुछ फिकर नही’च्या आवेशांत तिसरा कसोटी सामना खेळण्यासाठी ते सरसावले आणि ‘तीन दिवसांत’ त्यांना इंग्लंडच्या गोलंदाजांनी उखडून काढले. वर १ डाव ११७ धावांची तोफ डागली कीं ज्यामुळे ‘रबर’ गेलेच.

आठ वर्षांपूर्वी फाझलच्या नेतृत्वाखालीं गेलेल्या पाकसंघानें इंग्लंडबरोबर ‘रबर’ची भागीदारी केली होती. ह्या विजयामुळें

पाकिस्तामध्यें केवढा जल्लोश करण्यांत आला. सरकारनें सुट्टी जाहीर केली होती.

आणि आता आठ वर्षानंतर त्या तिथेंच इंग्लंडांत पाक संघानें 'रबर' गमावलें. आतां त्यांचे सरकार एक दिवस जादा काम करण्याचें फर्मान काढील कां ?

हें असं कसं झालं ? हा प्रश्न मला अजून भेडसावतो आहे. विचारांती ह्याची प्रामुख्यानें तीन कारणें आढळतात. एक तर ह्यावेळचा पाकचा संघ फार कमकुवत आहे. फलंदाजी आणि गोलंदाजी ह्या दोन्ही क्षेत्रांत ज्याला 'मस्त' म्हणतां येईल असा कोणी नाहीं. विशेषतः गोलंदाजींत तर ह्या संघावर फार मर्यादा पडल्या आहेत. फाझलसारखा त्रिभुवनांत पराक्रम गाजवील असा गोलंदाज ह्या संघांत नाहीं. महमद हुसेन व महमद फरुक षटकामागून षट्कें टाकून प्रभावी ठरले नाहींत. इन्तेखाब आलम हा मंदगतीचा 'लेगस्पीनर'ही आपला प्रभाव पाडूं शकला नाहीं. ऑफ स्पीनर हसीब हसन जायबंदी झाल्यामुळें पराक्रम दाखवूं शकला नाहीं ! फलंदाजीतही हीच रडकथा. बरकीची सारी भिस्त होती इनीफ व सयीदवर पण दोघांचेही नेमके ह्यांचवर्णी 'फॉर्म' गेलेले ! इनीफनें तिन्ही कसोटी सामने खेळून अवघ्या १२८ धांवा काढल्या ! सयीद ? ह्या सयीदबद्दल किती अपेक्षा बाळगल्या होत्या— 'विकेट'कडे जातांना त्याची चाल कॉम्प्टन व सोबर्सची आठवण करून देते. केवळ अकरा कसोटी सामन्यांत हजार धावा पुऱ्या करणाऱ्या ह्या उमद्या सयीदनें तिन्ही कसोटी सामने खेळून अवघ्या १७८ धावा काढल्या ! वा ! वेटा !! एकटा बर्की काय करणार ?

दुसरें म्हणजे जावेद बर्कीचे कुचकामी नेतृत्व. ह्या तरण्याबांड खेळाडूची शोककथा इंग्लंडला आपला संघ घेऊन गेलेल्या दत्ताजी गायकवाडसारखी आहे. बर्कीचा नेतेपणाचा अननुभवीपणा ह्या अपयशाला कारणीभूत आहे. इंम्तीआज एवढा तो मुरलेला नांहीं. स्वतः बर्कीनें 'ऑक्सफर्ड' गाजवलें असलें तरी तो पराक्रम नेतेपणाला कसा उपयोगी पडेल ? 'कव्हर'ला तो उत्कृष्ट क्षेत्ररक्षण करतो म्हणे, म्हणून काय तो उत्कृष्ट कप्तान होऊं शकतो ?

पाक खेळाडू हे त्यांची कडवड वृत्ती व शेवटपर्यंत लढण्याची ईर्षा ह्या दोन गुणांबद्दल प्रसिद्ध आहेत. पण इंग्लंडच्या सुदैवानें (!) हे दोन्ही गुण ह्यावेळीं पाक संघांत अभावानें तळपत आहेत !

भारताचा वेस्ट इंडीजमध्ये झालेला प्रचंड पराभव व सध्यां इंग्लंडमध्ये पाकिस्तानचा होत असलेला पराभव, हे दोन्ही पराभव एकाच मालिकेतले आहेत. तीन दिवसांचे कसोटी सामने ह्या देशांतील संघांबरोबर ठेवावेत हा जुना प्रश्न आतां इंग्लडमध्यें सध्यां नव्यानें चर्चिला जात आहे. 'इंपिरियल क्रिकेट कॉन्फरन्स' मध्यें हा प्रश्न उचल खाईल पण ह्यामध्ये संबंधित देशांनीं चिडून जाण्यासारखें कांहीं नाहीं. उलट; तीन दिवसाच्या ह्या सामन्यांमुळें प्रेक्षकांना शेवटपर्यंत ईर्षा व पराक्रम ह्यांचं दर्शन होईल. **—गोलंदाज**

● ● ●

---

( पान ६१ वरून )

शास्त्रीपंडित दिसला की त्याला संस्कृतांतले कुटश्लोक घालून अर्थ विचारीत. तो निरुत्तर झाला कीं स्वतः अर्थ सांगत. 'खरं म्हणजे मी जातीनें ब्राह्मण आहे हो; परंतु केवळ गाणं शिकण्याकरितां मुसलमान कुळांत जन्म घेतला,' असें ते कळवळून सांगत. गायनाचार्य वझेबुवांनी आपल्या या परात्पर गुरूंच्या अनेक आठवणी अत्यंत गहिवरून सांगितल्या आहेत.

कलकत्त्याच्या गव्हर्नरांच्या आमंत्रणावरून निसार हुसेन खाँ एकदां तिकडे गेले होते. आपल्या या खास कार्यक्रमांत त्यांनीं ग्वाल्हेरपासून कलकत्त्यापर्यंतच्या मुख्य मुख्य स्टेशनांची नांवे ओवून एक लांबलचक गीत म्हटलें. त्यांचें तें विनोदी पण रंजक गीत ऐकून श्रोते आणि गव्हर्नर खूष झाले. गाणें संपल्यावर गव्हर्नरांनी विचारलें, 'खाँसाहेब आपलं गाणं ऐकून आम्हीं खूप झालों, आपल्याला काय पाहिजे तें मागा !'

खाँसाहेब म्हणाले– 'साहेब, मुझे तो रेल में बैठनेका बहोत शौक है ! मुझे और कुछ नहीं चाहिये !.'

गव्हर्नरांना हंसूं आलें. ते म्हणाले– 'खाँसाहेब, तुम्हीं मनाला येईल तेवढा वेळ रेल्वेंत बसा. हिंदुस्थानच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत कुठेंहि जा तुमची मी व्यवस्था करतो !' असें म्हणून एक पहिल्या दर्जाचा आणि दोन दुसऱ्या दर्जाचे असे तीन कायम पास त्यांनी खाँसाहेबांना द्यायला लावले.

निसार हुसेन खाँसारखा भरतीदार तसाच चतुरस्र गवय्या ग्वाल्हेर घराण्यांत झाला नाहीं. सर्व ढंगांची गायकी—ध्रुपद, धमार, ख्याल, टप्पा, ठुमरी, भजनें, दादरे इत्यादि सर्व प्रकार–ते गायचे. अमुक एक गोष्ट निषिद्ध आहे असें त्यांनीं मानलें नाहीं. त्यांची तान तीनहि सप्तकें सहज फिरायची. बसल्याबरोबर हमखास बैठक रंगविणारा त्यांच्यासारखा गवय्या झाला नाहीं, असें जाणते लोक सांगतात. परीक्षा पाहण्याकरितां शिष्याला कसाला लावणारा, पण परीक्षेत उतरतांच शिष्यावर प्राणापलीकडे प्रेम करणारा असा हा तानसेनच्या वंशपरंपरेतला थोर गवय्या–ग्वाल्हेर घराण्याचे गाणें गाणाऱ्या महाराष्ट्रीय गायकांचा परात्पर गुरु–वयाच्या ७२ व्या वर्षी १९१६ सालीं इहलोक सोडून गेला. पण त्यांच्या शिष्यांनी त्यांच्या घराण्याचें नांव दिगंत गाजविलें.

● ● ●

---

हें मासिक, संपादक व मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०।४२ कॅनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रकाशित केलें.

अनुक्रमणिका








REGD. NO. B-7640
AUGUST 1962
DIPAVALI MONTHLY

राष्ट्राची सेवा
धूम्रपानाचा आनंद
सर्वांचें समाधान

गेल्या तीन तपांच्या वर **उंट** आणि **कोंबडा** छाप विड्यांनीं आपल्या देशांतील लक्षावधी लोकांना धूम्रपानाचा आनंद, तरतरी आणि मनसोक्त समाधान दिलें आहे. आज आमच्या कारखान्यांत एका कोटींच्या वर विड्या सुमारें **२५,०००** हातांनी दररोज वळल्या जात आहेत. या विड्यांसाठी अगदीं निवडक तंबाकू, उत्कृष्ट पानें आणि तींहि निवडून, वापरण्यांत येत असून त्या, धूम्रपानाचा एक आगळाच आनंद आणि समाधान भावि काळांतहि लक्षावधी लोकांना मिळत राहील.




बस्तीराम नारायणदास महेश्री आणि चांडक ब्रदर्स, सिन्नर (नाशिक)

अनुक्रमणिका